


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

वर्ष तिसरें
अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर १९४९

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक


| | | |
|---|---|---|
| योगी श्रीअरविन्द : संक्षिप्त चरित्र व तत्त्वज्ञान | श्री. वा. ल. चिपळुणकर | १–८ |
| महाराष्ट्रांतील न्यायसंस्था (इ. स. १३००–१८००) | डॉ. वि. त्र्यं. गुणे | ९–१५ |
| आजचें युग | श्री. जव्हेरभाई पटेल | १६–१९ |
| हेमाद्रीचा अंतकाल | प्रा. वा. वि. मिराशी | २०–२४ |
| ' अणोरणीयान् महतो महीयान् ' | श्रीअरविंद : अनु० श्री. ना. ग. जोशी | २४ |
| ' हिंदी जनता झिंदाबाद ' | प्रा. म. अ. मेहेन्दळे | २५–२९ |
| लोहयुग आणि संहितांची रचना | श्री. स. का. दीक्षित | ३०–३४ |
| चित्रकलेंतील नवें पर्व | श्री. माधवराव बागल | ३५–३७ |
| " रूपें हीं तुमचीं— ! " | गोडSटे : अनु० श्री. त्र्यं. सी. कारखानीस | ३८–३९ |
| ' स्वैर विहंग ' | रवींद्रनाथ ठाकूर : अनु० श्री. मा. गो. काटकर | ३९ |
| पौंड व रुपया यांचें अवमूल्यन | प्रा. ए. रा. घोंगडे | ४०–४४ |
| मोलिएरच्या नाटकांतलि डॉक्टर-पात्रें | प्रा. य. का. सोहनी | ४५–४८ |
| ' आमार जीबनइ आमार बानी ' | श्री. बा. भ. बोरकर | ४९ |
| पं. नेहरू यांची ऐतिहासिक दृष्टि | प्रा. रा. वि. ओतुरकर | ५०–५४ |
| ' पंडित नेहरू : इन्द्रवज्र कीं इन्द्रधाप ? ' | श्री. ना ग. गोरे | ५५–५९ |
| पं. जवाहरलाल नेहरू यांचें थोर व्यक्तित्व ! | त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी | ६०–६४ |
| सारसंकलन | | ६५–७२ |
| चुकीची दुरुस्ती | | ७२ |


वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच नवभारत कार्यालयांत प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका








# 'नवभारत', नोव्हेंबर १९४९

## लेखक-परिचय

**श्री. वा. ल. चिपळूणकर** ( पुणें )— थिऑसफिकल सोसायटीचे कार्यकर्ते व मराठी थिऑसफिकल फेडरेशनचे चिटणीस.

**डॉ. वि. त्र्यं. गुणे**, एम्. ए., पीएच्. डी. ( पुणें )— "The Judicial System of the Marathas" हा त्यांच्या पीएच्. डी. च्या प्रबंधाचा विषय होता. इतर लेखन : 'गुण्ये घराण्याचा इतिहास' —

**श्री. जव्हेरभाई पटेल** (नागपूर)—गुजरात विद्यापीठाचे 'ग्रामसेवादीक्षित', मध्यप्रांत—वऱ्हाडच्या ग्रामोद्योग-खात्याचे आयोजनाधिकारी. 'What shall we eat ?' 'आहार व पोषण' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**म. म. वा. वि. मिराशी** — उमरावती येथील विदर्भ-महाविद्यालयाचे प्राचार्य; प्राच्यविद्यापंडित, पुराणेतिहाससंशोधक, 'कालिदास' इ. पुस्तकाचे कर्ते.

**प्रा. म. अ. मेहेंदळे** — नवसारी येथील एस्. बी. गर्दा कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक.

**श्री. स. का. दीक्षित**, एम्. ए.— 'पुरातत्त्वशास्त्रा'चे व्यासंगी. "The Mother Goddess' या पुस्तकाचे लेखक; हिंदुस्थानसरकारनें पुरातत्त्वशास्त्राचे निवडलेले एक विद्यार्थी म्हणून हे चीनमध्यें चुंगकिंग वगैरे ठिकाणीं एक वर्ष होते.

**श्री. माधवराव बागल**— कोल्हापूर येथील प्रसिद्ध कार्यकर्ते, चित्रकलेचे व्यासंगी.

**श्री. त्र्यं. सी. कारखानीस** ( पुणें ) — 'महाराष्ट्र नाटक मंडळी'चे एक संस्थापक; 'राजाचें बंड', 'स्वैरिणी' इत्यादि नाटकांचे कर्ते.

**प्रा. ए. रा. धोंगडे** बी. कॉम् (लंडन) —मुंबईच्या सिडेनहॅम कॉलेजमध्यें प्राध्यापक; 'Elements of Commerce' या पुस्तकाचे एक लेखक.

**प्रा. य. का. सोहनी**— पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें फ्रेंच भाषेचे प्राध्यापक.

**श्री. बा. भ. बोरकर** ( पुणें )— महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध कवि; 'मावळता चंद्र' इ. कादंबऱ्यांचे लेखक; 'आमचा गोमंतक' या पाक्षिकाचे संपादक.

**प्रा. रा. वि. ओतुरकर**— पुणें येथील स. प. कॉलेजमध्यें इतिहासाचे प्राध्यापक; 'हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास,' 'हिंदुस्थानचा साधमरूप इतिहास' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. ना. ग. गोरे** ( पुणें )—सुप्रसिद्ध समाजवादी कार्यकर्ते; "नेहरूंचें आत्मचरित्र," 'विश्वकुटुंबवाद' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी** ( वाई )— 'धर्मकोश'चे मुख्य संपादक; 'हिंदुधर्मसमीक्षा,' 'जडवाद' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

---






श्री. वा. ल. चिपळुणकर

# योगी श्रीअरविंद : संक्षिप्त चरित्र व तत्त्वज्ञान

आधुनिक भारतांतील पुढाऱ्यांपैकीं योगी श्रीअरविन्द[1] हे एक थोर व अलौकिक बुद्धिमत्तेचे पुरुष आहेत. ते श्रेष्ठ श्रेणीचे कवी, खोल व मौलिक विचारांचे तत्त्वज्ञ, एकनिष्ठ योगाभ्यासी व मानवी जीवनाचे गूढ द्रष्टे अशा अधिकाराचे आहेत. हा त्यांचा चौफेर अधिकार लक्षांत घेतला असतां, महाराष्ट्रांतील संतशिरोमणि श्रीज्ञानेश्वरमहाराज, व पुराणकालीन व्यास महर्षि यांची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. प्रसिद्ध फ्रेंच तत्त्वज्ञ लेखक रोमां रोलां यांनीं त्यांचेविषयीं लिहितांना "पौर्वात्य व पाश्चिमात्य बुद्धिमत्तेचा महान् समन्वय" (Greatest synthesis between the genius of the East and the West) असें वर्णन केलें आहे.

## चरित्राचा अल्प परिचय

श्रीअरविंदांचा जन्म ता. १५ ऑगस्ट १८७२ या दिवशीं कलकत्ता येथें झाला. त्यांचे वडील डॉ. कृष्णधन हे आय्. एम्. एस्. या उच्च वैद्यकीय खात्यांत अधिकारी होते. तत्कालीन हिंदी लोकांच्या वृत्ती-प्रमाणें, त्यांची विचारसरणी व राहणी पूर्णपणें पाश्चिमात्य म्हणजे विदेशी होती. त्यांना असें वाटे कीं, आपल्या मुलांचें संवर्धन व शिक्षण इंग्लिश पद्धतीप्रमाणें करून त्यांना "बडे साहेब अधिकारी" बनवावें. म्हणून त्यांनीं आपले तिघे मुलगे लहान वयांतच विलायतेस घातले. अरविंद हे तिसरे चिरंजीव. त्या वेळीं त्यांचें वय सात वर्षांचें होतें. मुलांची राहण्याची व्यवस्था ड्री वेट् नांवाच्या एका धर्मो-पदेशकाच्या कुटुंबांत केली होती. दुय्यम शिक्षणास वयाचे तेरावे वर्षीं लंडनमध्यें सुरुवात होऊन, अठरावे वर्षीं केंब्रिज विद्यापीठाची किंग्ज कॉलेजकरितां त्यांना शिष्यवृत्ति मिळाली. दोन वर्षांनीं (Cassical Tripos) युरोपीय प्राचीन ग्रीक व लॅटिन वाङ्मयांतील परीक्षा प्रथमश्रेणींत येऊन, ते पास झाले. पुढल्या वर्षीं इंडियन् सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा पास होऊन ग्रीक व लॅटिन् भाषां-मध्यें त्यांनीं उच्चांक गांठला; पण अश्वारोहण-परीक्षेला ते न बसल्यामुळें, सिव्हिल् सर्व्हिसमध्यें त्यांचा प्रवेश झाला नाहीं. जर झाला असता, तर ते इतरांप्रमाणें कमिशनर, हायकोर्ट जज्ज किंवा एखाद्या प्रांताचे गव्हर्नरही झाले असते. पण त्यांचें विधि-लिखित भवितव्य वर निर्दिष्ट केलेल्या काव्य, तत्त्वज्ञान, योगाभ्यास व मंत्रद्रष्टृत्व या चार क्षेत्रांत ठरलें होतें, तिकडे त्यांचा जीवनप्रवाह आपोआप वाहूं लागला. याप्रमाणें इंग्लंडांतील (१८७९ ते १८९३) चवदा वर्षांचें वास्तव्य संपवून, १८९३ सालीं ते हिंदुस्थानांत परत आले.

लंडनमध्यें असतांनाच ह्यांची व बडोद्याचे नरेश सयाजीराव महाराज यांची गांठ पडली; व दोघांच्या संमतीनें त्यांची बडोदा संस्थानांत नेमणूक झाली. कांहीं दिवस मुलकी खात्यांत नोकरी केल्यावर, बडोद

(१) 'इंटरनॅशनल बुक सर्व्हिस' पुणें, या संस्थेचे संचालक रा. दीक्षित यांनीं यंदांची श्री अरविन्द यांची जयंती ता. १५–८–४९ रोजीं थिऑसॉफिकल सोसायटी, पुणें लॉज–मध्यें साजरी केली. तेथें केलेल्या भाषणाच्या आधारें हा लेख श्री. चिपळूणकर यांनीं तयार केला आहे. येत्या नोव्हेंबर २४ ला श्री अरविन्दांचा 'दर्शनदिन' आहे. त्या निमित्तानें अरविंदांच्या जीवनाचा व तत्त्व-ज्ञानाचा हा अल्प परिचय वाचकांना औचित्यपूर्ण वाटेल असा विश्वास आहे. –का. सं.

कॉलेजमध्यें ते इंग्लिशचे प्रोफेसर व पुढें व्हाइस-प्रिन्सिपल म्हणून काम करीत होते. या वेळीं ते ग्रीक व लॅटिन् भाषांचे उत्तम श्रेणीचे वाङ्मय-विशारद होते. त्याचप्रमाणें इंग्लिश, फ्रेंच, जर्मन व इटॅलियन या भाषांतील उच्च वाङ्मयाशीं त्यांचा चांगला सहवास होता. हिंदुस्थानांत येईतों-पर्यंत पौर्वात्य व हिंदी संस्कृतीचा त्यांना कांहीच संपर्क नव्हता. येथें आल्यावर आपली मातृभाषा बंगाली व हिंदुस्थानांतील इतर कांहीं प्रांतीय भाषाही ते शिकले. विशेषतः संस्कृत व प्राचीन आर्यसंस्कृति यांचें त्यांनीं गाढ अध्ययन केलें व आपलें जीवन व पोषाख वगैरे सर्व राहणी आर्यसंस्कृतीनुरूप ठेविली. याप्रमाणें वडिलांनीं नियोजित केलेले इंग्रजी थाटाचे भाषेचे बडे साहेब अगदीं त्याचे उलट पूर्णतया प्राचीन आर्यसंस्कृतीचे बनले. याच काळांत त्यांचा मृणालिनी बसू यांचेशीं विवाह झाला. त्यांचा व सयाजीरावमहाराज यांचा परस्पर प्रेमादराचा संबंध होता ! तेथेंच राहिले असते तर ते दिवाण-पदावरही चढले असते. पण पुन्हां विधिलिखित निराळेंच ठरलें होतें ! पुन्हां तिकडे त्यांचा जीवनप्रवाह वळला. याप्रमाणें बडोद्यास त्यांचें वास्तव्य ( १८९३–१९०६ ) तेरा वर्षें होऊन ते कलकत्त्यास १९०६ सालीं येऊन राहिले.

कलकत्त्यास येण्याला कारण लॉर्ड कर्झन साहेबांनीं केलेली बंगालची फाळणी होय. जनतेच्या असंतोषाच्या अग्नीच्या ज्वाला भडकल्या होत्या. अरविंदांनीं राजकारणांत प्रवेश केला. त्यांनीं राष्ट्रीय पक्षाचें दैनिक ' वंदे मातरम् ' या नांवानें काढलें. हें पत्र सर्व हिंदुस्थानांत अत्यंत आस्थेनें व उत्साहानें वाचलें जात असे; त्या पत्राचा मुख्य आदेश, नुसता वसाहतींच्या स्वराज्याचा नसून निर्भेळ स्वराज्याचा होता. पण हें ध्येय निव्वळ राजकारणाच्या बैठकी-वरून मांडलें न जातां, एकंदर जनतेची आध्यात्मिक बैठकीवरून जागृति व्हावी, अशा स्वरूपाचें असे. इतर पुढाऱ्यांना ही मिश्रपद्धति नापसंत होती. महाराष्ट्रांतील दिवंगत देशभक्त अष्टेकर–मंडळीचे श्री. हरि रघुनाथ भागवत हे या ' वंदे मातरम् 'ची मराठींतून प्रतिकृति प्रसिद्ध करीत असत. या पत्रानें झालेली प्रचंड जागृति लक्षांत घेऊन श्रीअरविंदांवर सरकारनें राजद्रोहाचा खटला भरला. त्यांत ते दोषमुक्त झाले. पण सरकारनेंही तें पत्र बंद केल्यामुळें अरविंदांनीं ' कर्मयोगी ' नांवाचें साप्ताहिक काढलें. त्यांत राजकारणाचा कांहीं भाग घालून, ते गीता व उपनिषदें यांसारख्या आध्यात्मिक विषयांची चर्चा करीत. या लेखांमधूनच त्यांचे हल्लींचे गीतेवरील सुप्रसिद्ध निबंध प्रसिद्ध झाले.

यावेळीं बंगालमध्यें एक सशस्त्र क्रांतिकारकांची चळवळ उत्पन्न झाली होती. त्यामध्यें त्यांचे बंधु बरेंद्र हे प्रमुख असत. या चळवळीशीं वस्तुतः अरविंदांचा संबंध नव्हता. पण सख्खा भाऊ या चळवळीमध्यें आहे या संशयावरून व माणिकतोळा बागेमध्यें बॉंब तयार करण्याचीं साधनें सांपडल्यामुळें, अरविंदांच्या,आयर्लंडमधील ' सिनफिन् ' स्वरूपाच्या, राजकीय जीवनाचा कांटा कायमचा उपटून टाकण्याकरितां सरकारनें त्यांचेवर माणिकतोळा कटाचा पुन्हां खटला भरला. तो एक वर्ष चालला होता.सरकारतर्फे सुप्रसिद्ध मि. नॉर्टन् हे बॅरिस्टर होते. अरविंदांतर्फे कै. चित्तरंजन दास होते. जज्ज मि. बीचक्रॉफ्ट होते. विधिघटना अशी कीं, हे बीचक्रॉफ्ट् अरविंदांच्याचबरोबर सिव्हिल सर्व्हिस परीक्षेमध्यें, दुय्यम प्रतीचे खालचे मार्क मिळून, त्यांचेबरोबरच पास झाले होते. याही खटल्यांतून एक वर्षानें ते ता. ९ मे १९०९ ला दोषमुक्त झाले.

या वेळीं राष्ट्रीय पक्ष क्षीण झाला होता. कित्येक पुढारी कारागृहांत टाकले गेले, तर कित्येक काळ्या पाण्यावर धाडले गेले; कित्येक तर स्वतः होऊनच देशोधडीला गेले होते. अशा स्थितींत एका बाजूनें नेमस्त पक्षाच्याविरुद्ध चळवळ करणें, तर दुसऱ्या बाजूनें राष्ट्रीय वृत्तीची जनतेमध्यें जागृति करणें दुष्कर झालें.अरविंदांनीं राजकारणाचा संन्यास केला, आपलें कार्यक्षेत्र राजकारण नव्हे, असें ओळखलें. आध्यात्मिक उन्नतीकरितां साहाय्य करणें हेंच आपलें कार्य, असें ओळखून ते प्रथम चंद्रनगरला व नंतर पॉंडिचेरीला जाऊन स्थायिक झाले. ही घटना फेब्रुआरी १९१० मध्यें झाली. व तेथेंच आजपर्यंत चाळीस वर्षें त्यांचें अखंड वास्तव्य आहे.

आतां त्यांच्या काव्य, तत्त्वज्ञान, योगाभ्यास व मंत्रद्रष्टृत्व या कार्यांचा विचार करूं.








## अरविन्दांच्या साहित्याचें स्वरूप

श्रीअरविंदांनीं आजपर्यंत तीस-एक ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. कांहीं पद्यरूप तर कांहीं गद्यरूप आहेत. त्यांचें बाह्य रचनास्वरूप कांहींही असलें तरी त्या सर्वांमध्यें अध्यात्माचा दोरा अनुस्यूत आहे. किंबहुना त्यांना योगाभ्यासांत जें जे अनुभव आले किंवा तत्त्वदर्शन घडलें, तेंच त्यांनीं कांहीं प्रसंगीं काव्यरूपानें, निरनिराळया छंदांत गायिलें! तर तत्त्वज्ञानग्रंथांत तेंच अनुभव व दर्शन तर्कारूढपद्धतीनें बुद्धिवादाला धरून मांडलें. पण त्या सर्वांचा गाभा त्यांना योगाभ्यासांत प्रतीत झालेले अनुभव व तत्त्वदर्शन हींच होत.

त्यांचे प्रमुख काव्यग्रंथ म्हणजे 'Ahana', 'Illion' 'Love and Death' 'उर्वशी' व 'सावित्री' हे होत. तज्ज्ञांच्या मतें कवि व काव्यपरीक्षक या दोन्हीही क्षेत्रांत त्यांचा दर्जा प्रथमश्रेणींतच लागेल. त्यांच्या काव्यरचनेंत काय किंवा काव्यपरीक्षणांत काय, भावी कालांतील आगामी काव्याची व काव्यरचनेची पूर्वच्छाया दृग्गोत्पत्तीस येते. यासंबंधीं त्यांचे Future Poetry म्हणून लेख प्रसिद्ध आहेत. या प्रमाणें काव्यकल्पनांतच काय पण षट्पदी अगर मुक्तछंद यांत सुद्धां त्यांचें प्रभुत्व प्रशंसनीय आहे. बडोद्यास प्राध्यापक म्हणून त्यांचें वास्तव्य असतांना, तेथे श्री. रमेशचंद्र दत्त कांहीं काळ (सन १८९९) दिवाण होते. त्यावेळीं श्री. दत्तांचे महाभारत व रामायण हे दोन्ही काव्यग्रंथ प्रसिद्ध होऊन, त्यांच्या विद्वत्तेची साहजिकच चहूंकडे वाखाणणी होत होती. त्यावेळीं अरविंदांनींही महाभारत व रामायण या ग्रंथांतील कांहीं प्रकरणें काव्यरूपांत रचिलीं होतीं. तीं प्रकरणें रमेशचंद्रांनीं वाचून पाहिलीं. त्यावेळीं त्यांनीं असे उद्गार काढिले कीं "मी माझीं भाषांतरें करण्यांत व्यर्थ काळ घालविला. मला जर हीं प्रकरणें आधीं वाचावयास मिळाली असतीं तर मी माझे ग्रंथ प्रसिद्धच केले नसते!" वर उल्लेखिलेले अरविंदांच्या पांच काव्यग्रंथांपैकीं पहिले तीन (Ahana, Illion, Love and Death) हे तर उघडच आध्यात्मिक आहेत. पण 'उर्वशी' व 'सावित्री' हीं काव्यें पौराणिक कथानकांच्या स्वरूपाचीं असूनसुद्धां त्यांत आत्मज्ञान भरपूर ओतलें आहे. 'सावित्री' या काव्याचे आजपर्यंत तीनच सर्ग प्रसिद्ध झाले आहेत. पण त्यांचा विस्तार मिल्टन् कवीच्या Paradise Lost व Paradise Regained या दोन्ही काव्यांच्या एकत्रित विस्तारापेक्षां जास्त झाला आहे. व अंतरंग जर पाहिलें, तर सावित्री सतीनें आपला भर्ता सत्यवान् याला यमदेवाच्या पाशांतून मुक्त केलें, येवढेंच सारें कथानक असतांना, तें काव्य वाचून, हें काव्य नसून 'असतो मा सद् गमय। तमसो मा ज्योतिर्गमय। मृत्योर्मा अमृतं गमय—हे प्रभो, मला असताकडून सताकडे पोंचवा; अंधकारांतून प्रकाशाकडे मार्ग दाखवा. मृत्यूकडून अमृतत्वाकडे वाट दाखवा' या उपनिषद्-वचनांवर एक महाभाष्यच आहे असें आढळून येतें.[२] व म्हणूनच त्यांनीं या काव्याला स्वतः

२ यासंबंधीं 'सावित्री' आख्यानांतील त्यांच्याच हातच्या पुढील ओळी किती अन्वर्थक आहेत, पहा :

Our destiny is written in double terms :
Through nature's contraries, we draw near God.
Out of darkness we have grown to light;
Death is our road to immortality.
"Cry Woe, cry Woe" the World's voices wail
Yet conquers the eternal Good at last.

—*Savitri*, Book VI, Canto I

Savitri—a Legend and a Symbol 'सावित्री'-
थ्या व आध्यात्मिक संकेत अशीच संज्ञा
देली आहे.

तत्त्वज्ञानाचे त्यांचे मुख्य ग्रंथ म्हणजे Secret of the Veda'; 'The Riddle of the World'. 'Hymns to the Mystic Fire'; 'ईशोपनिषद्'; 'गीतानिबंध', व Life Divine.'. पैकीं शेवटला ग्रंथ म्हणजे यांचा ( Magnum Opus ) महान् ग्रंथ होय. याचा विस्तार दोन भागांमिळून दोन हजार पृष्ठांचा आहे. त्यांत आर्य तत्त्वज्ञानाचे सर्व भाग येऊन गेले आहेत. या ग्रंथाची वाहवा पौर्वात्य व पाश्चिमात्य दोन्ही खंडांत झाली आहे. कारण त्यांची रचना व चर्चा योगानुभवावरच पण तर्कारूढ बुद्धिवादाच्या बैठकीवरून केली आहे. त्यांत कांहीं ठिकाणीं पूर्वाचार्यांची मांडणी व दृष्टि सदोष ठरविली आहे. तसेंच पाश्चिमात्य तत्त्वज्ञानांतील सदोष व अपूर्ण स्थळांचाही परामर्ष घेतला आहे. म्हणूनच कांहीं महिन्यांपूर्वी, आंध्र प्रांतांतील अन्नमलाई विद्यापीठातर्फे त्यांना मानपत्र देऊन त्यांचा मोठा सत्कार करण्यांत आला. तसेंच अमेरिकेंत यंदा त्यांच्या या महान् कृतीची, त्यांच्या वाढदिवसानिमित्त, विशेष आवृत्ति काढून प्रसिद्ध करण्यांत आली. त्याचप्रमाणें नोबेल् प्राइझ् मिळालेल्या तिकडील प्रसिद्ध साहित्यिका पर्ल बक् वगैरे साहित्यिकांनीं, यांना वाङ्मयाचें यंदाचें नोबेल् पारितोषिक देण्यांत यावें, अशी शिफारस केली आहे.

### तत्त्वज्ञानाचें स्वरूप

त्यांच्या तत्त्वज्ञानाचा सारांश असा: 'हें जग निव्वळ सत्—चैतन्यरूप नाहीं; अगर निव्वळ असत्—जडरूप नाहीं. या दोन्ही तत्त्वांनीं तें संमिश्र आहे. यांपैकीं एकाच तत्त्व-भूमिकेचा अतिरेक अगर आग्रह धरल्यानें, पूर्वेकडील काय किंवा पाश्चिमेकडील काय, तत्त्वज्ञान सदोष झालें आहे. निव्वळ सद्रूपाचा, अध्यात्माचा अतिरेकी आग्रह धरल्यानें पूर्वेकडे मिथ्यावादाचा जन्म झाला व जनता निष्क्रिय झाली; तर उलट पाश्चिमेकडे जडवादाचा अतिरेक झाल्यानें भोगवाद जन्मला व जनतेमध्यें स्वार्थ वाढला. जगांत दृश्य व अदृश्य अशा अनेक सृष्टी अगर लोक आहेत, पण हे सगळे भूलोकापासून ब्रह्मलोकापर्यंत, सगळे सारखेच ईशकृतीचे, अतएव सारख्या महत्त्वाचे आहेत. भूलोक हा अपवित्र व मिथ्या नाहीं व स्वर्ग हा कांहीं विशेष पवित्र व दैवी स्थान नाहीं. पाश्चिमात्य उत्क्रांतिवादाला, जडाच्या अंतर्यामांत वसत असलेल्या चैतन्याचें आस्तित्व मानल्याशिवाय, सुसंगत्व येणें शक्य नाहीं. आतापर्यंत मानवाचा विकास देह-प्राण-इंद्रियें व मन यांच्या विकासापर्यंत येऊन पोंचला आहे. यापुढें उन्मनी अवस्थेकडे हा विकास जाणार आहे व या स्थितीपर्यंत जाण्याची पात्रता सध्यांच्या मानवाला निकटवर्ती, जवळच आली आहे. पूर्वीच्या काळांत कित्येक ऋषींनीं ही उन्मनी अवस्था गांठली. पण तेथीलच उच्च आनंदांत ते इतके मग्न झाले कीं, ते इहलोक विसरून तेथेंच रममाण झाले व 'ब्रह्मानंदीं लागली टाळी। कोण देहातें सांभाळी।' अशी त्यांची अवस्था झाली. याच वृत्तींतून मिथ्यावादाचा जन्म झाला. वस्तुतः त्या उच्च भूमिकेवर पोंचल्यावर त्यांनीं तेथील तेज, तेथील सामर्थ्य, तेथील ज्ञान व तेथील आनंद या भूलोकापर्यंत खालीं आणायला पाहिजे होता व याप्रमाणें आपली स्वतःची पूर्ण उत्क्रांति करून, लोकसंग्रहाला—म्हणजे सर्व मानवजातीच्या उत्क्रांतीच्या कार्याला लागायला पाहिजे होते. While his head was shining in the sky, his feet were firmly planted on earth ही प्लेटो या तत्त्वज्ञान्याची वर्णन केलेली स्थिति ही खरी आत्मज्ञानाची स्थिति होय. वैयक्तिक मुक्ति ही खरी मुक्तीच नव्हे. पण हें त्यांच्यानें झालें नाहीं. जगाच्या उत्पत्तीचें कारण अविद्या, अहंकार अगर भ्रम, यांपैकीं एकही खरें नाहीं. या संबंधांत त्यांचें 'जीवन्मुक्त' हें आठ कवितांचें (१९३४ मधील) काव्य वाचण्यासारखें आहे. 'यांतील माझे











अनुक्रमणिका

विचार वेदांती लोकांना पटणार नाहींत' असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे.[3]

## योगाभ्यास

श्रीअरविंदांच्या योगाभ्यासास सन १९०५ सालीं बडोद्यास असतांनाच सुरुवात झाली. त्यावेळीं योगिजनांच्या सहवासाकडे त्यांची मनोवृत्ति विशेष असे. त्यावेळची तपशीलवार माहिती उपलब्ध नाहीं. पण त्यांचा अभ्यास कांहीं दिवस नर्मदातीरवासी ब्रह्मानंद यांच्या एका शिष्याच्या साहाय्यानें चालला होता. त्यांनीं प्राणायामापासून सुरुवात केली. कांहीं दिवस उमरावतीचे महाराष्ट्रीय गृहस्थ कै. विष्णु भास्कर लेले यांचेंही त्यांना मार्गदर्शन झालें. बडोदा कॉलेजचे प्रिन्सिपॉल ए. बी. क्लार्क यांनीं त्यावेळच्या श्रीअरविंदांच्या वृत्तीबद्दल उद्गार काढले कीं, "जोन् ऑफ आर्कचे कानावर देवलोकांतील शब्द पडत असत, तर श्रीअरविंदांच्या डोळ्यांसमोरून देवलोकांतील दिव्य दर्शनें (visions) जात आहेत."

पुढें ते कलकत्यास गेल्यावर १९०६ ते १९०९ पर्यंत त्यांची प्रगति विशेष झाल्यासारखी दिसते. कारण माणिकतोळा-खटला एक वर्षभर चालत असतां त्यांची वृत्ति इतकी योगस्थ होती कीं त्यांनींच स्वतः आपल्या 'कारा-कहाणी' या लेखांत लिहिलें आहे कीं, "'कारागारांतील एक वर्षाचें वास्तव्य' असा या वास्तव्याचा मी उल्लेख केला आहे; पण वस्तुतः हें वास्तव्य एखाद्या अरण्यांतील आश्रम-जीवनच तपस्वरूपी होतें. ब्रिटिश सरकारच्या रागानें माझें कल्याण झालें व त्याचें फळ म्हणजे मला ईश्वरी साक्षात्कार झाला." त्या वेळीं त्यांनीं कोर्टांतील सर्व व्यवहार-चौकशी, साक्षीदार व त्यांच्या जबान्या, चौकशी करणारे जज्ज त्यांच्याच केंब्रिज कॉलेजांतील सहाध्यायी मि. बीचक्रॉफ्ट, सरकारी वकील व त्यांचें भाषणें-ह्या सर्व घटना व माणसें त्यांना श्रीकृष्ण व त्याचें लीलारूप दिसूं लागलीं. त्याच सुमारास त्यांना योगदीक्षानुग्रह कोणातरी सिद्ध महंताकडून झाला असावा असें वाटतें.

सन १९१० मध्यें पॉंडिचरीस स्थायिक झाल्यावर हा त्यांचा अभ्यास अखंड व शांत रीतीनें चालू झाला. चार वर्षांनीं त्यांनीं 'आर्य' हें मासिक १९१४ सालीं सुरू केलें. कांहीं वर्षांनीं मि. पॉल रिशर्ड व त्यांच्या पत्नी मादाम मीरा रिशर्ड हें पति-पत्नींचें जोडपें अध्यात्माच्या शोधांत त्यांच्या दर्शनास आलें व तेथेंच त्यांचें शिष्यत्व पत्करून, त्यांचें सहकारी बनलें. प्रथम 'आर्य' मासिकावर श्रीअरविंद व हे दोघे असे तिघेहि संपादक म्हणून लिहिले जात असत. पुढें मि. पॉल रिशर्ड हे परत स्वदेशीं गेले. पण त्यांच्या पत्नी या तेथेंच आज-पर्यंत प्रमुख कार्यकर्त्या म्हणून आहेत. त्यांना (Mother) 'माताजी' या नांवानें तेथें संबोधिलें जातें. 'आर्य' मासिक सन १९२१ मध्यें बंद झालें. त्या सात वर्षांच्या अवकाशांत श्रीअरविंदांची सर्व ग्रंथसंपत्ति बाहेर पडली. ह्यांपैकीं योगाभ्यासाचे ग्रंथ 'Synthesis of Yoga', 'Yoga and its objects', 'Lights on Yoga' व 'Letters of Shri Aurovindo, Vols. 1 and 2' हे होत. हल्लीं तेच ग्रंथ फिरून संकलित रूपानें पुन्हां तपासून सुधारून प्रसिद्ध केले जात आहेत. गेल्या पांच वर्षांपासून 'Advent' या नांवाचें एक त्रैमासिक त्यांचे शिष्य काढीत असतात. त्यांत कांहीं लेख

---

३. ह्यांतील पुढील कवितांमध्यें आपली जीवन्मुक्ताची कल्पना त्यांनीं स्पष्ट केली आहे:

Although consenting here to a mortal body,
He is the Undying; limit and bond he knows not,
For him the aeons are a play-ground,
Life and its deeds are his splendid shadow;
Only to bring God's forces to wailing Nature
To help, with wide-winged Peace, her tormented labour,
And heal, with joy, her ancient sorrow,
Casting down light on the inconscient darkness,
He acts and lives............

स्वतः श्रीअरविंदांचे असून कांहीं नवीन ग्रंथही लेखरूपानें येत आहेत.

## ‘एका नवीन क्रियाशक्तीच्या शोधांत’

याप्रमाणें श्रीअरविंदांचा अभ्यास व उद्योग शांत रीतीनें चालला असतां बाह्य जगांतील त्यांचे स्नेही व सहकारी यांना त्यांची आठवण होऊन त्यांचे मार्गदर्शी पुढारीपणाची जरूरी भासे. त्याप्रमाणें पॉंडिचरीस आल्यावर सात वर्षांनीं त्यांना कॉंग्रेसनें अध्यक्ष नेमण्याचा ठराव (१९१७) केला; पण तो मान त्यांनीं सविनय नाकारला. एकदां (१९२०) लाला लजपतराय व देवदास गांधी त्यांना परत बोलावण्याकरितां स्वतः गेले. पण त्यांनीं तें नाकारलें. एकदां तर १९२२ मध्यें त्यांचे स्वतःचे वकील बाबू चित्तरंजन दास त्यांना बोलावण्यास गेले. पण त्यांना उत्तरादाखल लिहिलेल्या पत्रांत ते म्हणतात : “ मानवजाति एका चक्रापत्तींत सांपडली आहे. मी एका नवीन क्रियाशक्तीच्या शोधांत आहे....... समाजरचनेकरितां एक निर्दोष पाया हवा आहे ! ” [४]

यानंतर सन १९२८ सालीं रवींद्रनाथ टागोर हे युरोपकडे जाण्यास निघाले असतांना यांच्या भेटीकरतां त्यांनीं पॉंडिचरीला मुद्दाम मुक्काम केला, व त्यावेळीं भेटीमध्यें ते त्यांना म्हणाले, “ माझें तुम्हीं ऐका. तुम्ही जगाला देण्याकरितां एक संदेश संपादन केला आहे, व तो तुमच्या मुखानें आमच्या कानीं पडण्याची आम्हीं वाट पहात आहोंत. हिंदुस्थान हा एकंदर जगाला तुमच्या मुखानें संदेश देणार आहे. ” यानंतर १९४३ सालीं त्यांचे एक पट्टशिष्य दिलीपकुमार रॉय यांनीं त्यांची विशेष भेट घेऊन त्यांना विचारलें, “ तुम्ही आतां बाह्य जगांत केव्हां येणार ? ” तेव्हां श्रीअरविंदांनीं स्मित केलें, व म्हटलें : “ तें मला माहीत नाहीं. ” दिलीपकुमार यांनीं फिरून प्रश्न केला : “ या तुमच्या बोलण्याचा अर्थ काय ? हें तुम्हांला खात्रीनें माहीत असलेंच पाहिजे. ” तेव्हां श्रीअरविंद हंसून म्हणाले : “ तुम्हांला ज्या तऱ्हेनें कोणतीहि गोष्ट माहीत होते, त्या तऱ्हेनें मला माहीत होत नाहीं. मी हल्लीं मनो भूमिकेवर नाहीं. कोणत्याहि गोष्टीचा त्या भूमिकेवरून मी निश्चिति करीत नाहीं. हल्लीं माझी परिस्थिति पूर्वनियोजित नाहीं. ”

वरील सर्व घटना वाचल्या म्हणजे पुराणकथानकांतील ध्रुवाची आठवण होते. ध्रुव देवाच्या तपासाला जात असतांना त्याचा बाप त्याच्या पाठीमागें धांवन जाऊन, ‘तुला एक गांव देतों, दहा गावें देतों, सर्व राज्य देतों, पण तूं परत फीर.’ असें म्हणाला, पण ध्रुव हा परत फिरला नाहीं, या गोष्टींची सहज आठवण होते. व अरविन्दांची योगाभ्यासाबद्दल एकनिष्ठा व पूर्णतया केलेलें आत्मसमर्पण प्रतीत होतें.

## आश्रमीय जीवन

याप्रमाणें श्रीअरविंदांचा योगाभ्यास, वाङ्मयनि-उद्योग चालू असतांना कांहीं वर्षांनीं युरोप, अमेरिका व हिंदुस्थान येथील अनेक स्त्री-पुरुष मुमुक्षजन तेथें त्यांच्या दर्शनास येऊन अभ्यासाकरितां राहूं लागले. त्यांची राहाण्या-जेवण्याची सोय करणें जरूर झालें. त्याकरितां अनेक इमारती व घरें कांहीं खरेदीनें तर कांहीं भाड्यानें घेण्यास सुरुवात झाली. मुख्य इमारत ‘गोलकोंड’ यामध्यें श्रीअरविंद, माताजी व कांहीं निवडक शिष्य राहतात. बाकीच्या इमारतींतून इतरांची व्यवस्था असते. याप्रमाणें हल्लीं तेथें सहाशेंच्यावर अंतेवासी रहात आहेत. त्यामध्यें वाङ्मय, विज्ञान, कला वगैरे विद्यांतून विशारद झालेले व अनेक धंद्यांचे व दर्जाचे स्त्री-पुरुष आहेत.

---

[४] ‘I see more and more manifestly that the man can not get out of the *futile cycle* the race is always treading, until he has raised himself on to a *new foundation*... I have still to remain in retirement; for I am determined not to work in the external field, till I have the sure and complete possession of this *new power of action*... ”

Nov. 1922



अनुक्रमणिका






त्यांची राहण्याची व भोजनाची व्यवस्था अगदीं साधी व सात्त्विक तऱ्हेची ठेवली आहे. तेथें अध्ययनाकरितां ग्रंथालय, ग्रंथ-विक्रीचें दुकान, एक पेढी, प्रार्थनामंदिर इतकीच व्यवस्था नसून इमारतींच्या भोंवतीं उद्यानभूमिका व स्नानकुंडें यांचीहि व्यवस्था आहे. उद्यानांतून सर्व तऱ्हेचीं फुलझाडें व फळझाडें-हि आहेत. कांहीं अंतरावर शेतें घेऊन तेथें भात व इतर अन्नधान्यें पिकविलीं जातात. याप्रमाणें त्या ठिकाणीं पूर्व व पश्चिम या दोन्हीं संस्कृतींचा मधुर संगम झालेला असून, एकंदर वातावरण शांततेचें, समाधानाचें व स्वावलंबनाचें आहे. याप्रमाणें या उत्कृष्ट आश्रमाची उभारणी वर उल्लेख केलेल्या 'माताजी' (मादाम् मिरा रिशर्ड) यांच्या कर्तबगारीची आहे.

श्रीअरविंदांची राहणी अत्यंत एकाकी व एकांतिक आहे. त्यांचें दर्शन रोज फक्त माताजी वगैरेसारख्या अत्यंत निकटवर्ती माणसांनाच तेवढें असतें. बाकीच्यांचा व्यवहार खासगी पत्ररूपानें अगर लेखी प्रश्नोत्तररूपानेंच सर्व असतो. ही व्यवस्था माताजींकडे आहे. अंतेवासी व बाह्य जगांतील इतरही मुमुक्षूंना वर्षांतून चार वेळां म्हणजे फेब्रुवारी ता. २१, एप्रिल ता. ४, ऑगस्ट ता. १५ व नोव्हेंबर ता. २४ या चारच महिन्यांत या विवक्षित तारखांनाच फक्त दर्शनलाभ असतो. त्या दिवशीं श्रीअरविंद खुर्चीवर बाहेर येऊन बसतात व जमलेले लोक रांगेनें एकामागून एक दर्शनपुष्पांजलि अर्पण करून पुढें जातात. याप्रमाणें त्या दिवशीं हजार-दोनहजार मुमुक्षुजन येऊन जातात. हा समारंभ साधारणपणें तीन तासांचा होतो.

## गुरुस्थानीं कोण असावेत ?

श्रीअरविंदांचें वरप्रमाणें लिहिलेलें अलौकिक जीवन वाचल्यावर एक अत्यंत नाजुक पण मनोरंजक प्रश्न उत्पन्न होतो कीं, त्यांच्या या योगाभ्यासामार्गे केवळ आत्मस्फूर्तीच तेवढी आहे, किंवा एखाद्या गुरुस्थानीं असलेल्या विभूतीची प्रेरणा व मार्गदर्शन आहे ? यासंबंधीं पुढील गोष्ट विचारांत घेण्यासारखी आहे. त्यांच्या काव्यग्रंथांत Nine Poems म्हणून एक प्रकरण आहे. त्यांत एक काव्य The Mahatmas-Kuthumi या संज्ञेचें आहे. ह्या काव्याचें त्यांनीं वर्णन करतांना "Purely a play of the imagination, a poetic reconstruction of the central idea only of Mahatmahood-केवळ कल्पनातरंग, सिद्धपुरुष या अधिकाराच्या मध्यवर्ती कल्पनेची काव्यमय पुनर्रचना" असें केलें आहे. या काव्यांत ऋषि कुथुमी यांनीं आपले स्वगत विचार मांडले आहेत. त्यांत त्यांनीं आपले पूर्वजन्म व भगवान् व्यासांच्या मार्गदर्शनानें केलेली हठयोग—व राजयोग—तपस्या, अखेरीस श्रीकृष्णाचें झालेलें दर्शन, यांचें वर्णन करून श्रीकृष्णांनीं त्यांच्याकडे नियोजित केलेल्या कार्याचें स्वरूप[१] दिलें आहे.

---

[१] "There, full of light and strength and bliss I soared
Beyond the spheres, above the mighty Gods;
And left my human body on the snows.
And others gathered to me, more or less,
In a puissance, to assist; but mine the charge
By Vishnu given; I gathered knowledge here.
Then to human frame awhile descend,
And walk 'mid men, choosing my instruments,
Testing, rejecting and confirming souls--
Vessels of the spirit. For, the golden age
In Kali comes, the iron lined with gold,
The Yoga shall be given back to men,
The sects shall cease, the grim debates die out;
And Atheism perish from the earth,
Blasted with knowledge, love and brotherhood
And wisdom repossess Shri Krishna's world."








त्याप्रमाणें त्यांचें कार्य कलियुगामध्यें निरनिराळ्या योग्य लोकांची कल्कि-अवताराचे आरंभाकरितां निवड करून त्यांना त्या अवतारांतील कार्य करण्याची पात्रता त्यांमध्यें उत्पन्न करणें, हें आहे.

आतां या ठिकाणीं असा एक नाजुक पण गूढ तात्त्विक प्रश्न उत्पन्न होतो कीं श्रीअरविंदांचे गुरुदेव कोण ? त्यांना अनुग्रह कोणाचा ? हें कधींच त्यांनीं अगर इतर कोणीं प्रगट केलें नाहीं. असाच प्रश्न श्रीसमर्थ रामदासांच्याबद्दल निघतो. कोणी म्हणतात, प्रत्यक्ष श्रीरामचंद्रांचाच त्यांना अनुग्रह होता. पण योगशास्त्राच्या दृष्टीनें हें उत्तर समाधानकारक नाहीं. तसेंच अरविंदांबद्दल आहे. सिद्धावस्थेस पोंचलेल्या आधिकारी पुरुषांमधून प्रतीक म्हणून त्यांनीं ऋषि कुथुमी यांनाच निवडून त्यांच्यासंबंधीं काव्य का रचलें असावें ? पुराणग्रंथांतून ऋषि कुथुमी यांचें वर्णन, भगवान् व्यासांच्या सामवेदीय शिष्यपरंपरेपैकीं ते एक होते, असें आहे. त्याचप्रमाणें मॅडम् ब्लॅव्हॅट्स्की व कर्नल ऑल्काट यांनीं ज्या ऋषिद्वयाच्या आज्ञेनें व मार्गदर्शनाखालीं थिऑसॉफिकल सोसायटीची स्थापना केली, त्यापैकीं हे एक आहेत, असें आरंभापासून थिऑसॉफिकल सोसायटीच्या इतिहासांत नमूद आहे. त्यांचें नांव थिऑसफीय ग्रंथांतून Master Koothoomi असें लिहिलें जातें. त्यांच्याकडे पुढील युगांतील 'व्यास'-कार्य नियोजित आहे, व त्या कार्याचें स्वरूप मिसेस बेझंट यांनीं अनेक व्याख्यानांतून श्रीअरविंदांच्या वरील शब्दांतच अनेक वेळां केलें आहे. यावरून आमचा कयास असा आहे कीं, ऋषि कुथुमी हे त्यांच्या गुरुस्थानीं असावे व त्यांना त्यांचा दीक्षानुग्रह माणिकतोळा खटल्याच्या सुमारास १९०९ सालीं, आगेमागें झाला असावा. वस्तुस्थिति काय असेल ती त्यांची त्यांना स्वतःलाच माहीत.

"A new spirit of oneness will take hold of the human race. मानववंशामध्यें एक नवीनच ऐक्यवृत्ति उत्पन्न होणार आहे" हा सध्यांच्या मानवसमाजाला तिच्या भवितव्यतेसंबंधींचा त्यांचा दिव्य संदेश आहे. गेल्या दोन हजार वर्षांपासून मानवसमाजांत ज्या अनेक घटना झाल्या आहेत त्यांचें ऐतिहासिक परीक्षण केलें असतांना श्रीअरविंदांच्या या भावी दर्शनाचें प्रत्यंतर सहज पटण्यासारखें आहे.

---

## अरविंदबाबूंच्या योगसाधनेचें साधन

जीवनाची पूर्णता हें अरविंदबाबूंच्या योगसाधनेचें साध्य आहे. निसर्गाला किंवा अंतिम दिव्य शक्तीला आपलें जीवन पूर्णतः समर्पण करणें, हें त्या साधनेचें साधन आहे. ह्याच दिव्य शक्तीला ते 'आई' अशा विशुद्ध, अपार प्रेमदर्शक लाडिक नांवानें संबोधतात. या ठिकाणीं एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं, अरविंद महर्षि ज्या एका उच्च पातळीवरून जीवनाचें चिंतन करतात त्या पातळीवर शब्दांचे रूढ अर्थहि बदलून जातात. निसर्ग, वास्तवता, आई, जीवन, समर्पण इत्यादि सर्व शब्दांना एक उदात्त, विशाल अतीन्द्रिय अर्थ प्राप्त होतो. त्यांचा निसर्ग म्हणजे चर्मचक्षूंना भोंवती दिसणारी जड सृष्टि नव्हे, भावनेला जाणवणारा बाह्य विषय नव्हे. बुद्धीलाही जें आकळूं शकत नाहीं तें पाहूं शकणारी दिव्यदृष्टि त्यांच्याजवळ आहे, आणि त्या दृष्टीला दिसणारी जी सृष्टि आहे तिला उद्देशून ते रूढ शब्द वापरतात. त्यांचा विचार-प्रदेश इंद्रियांच्या नि बुद्धीच्या कक्षेपलीकडे सुरू होतो. आणि म्हणूनच त्यांचा 'निसर्ग' म्हणजे सबंध विश्वजीवनाच्या मुळाशीं असलेली प्रेरक चैतन्यशक्ति होय.

—'सिद्धार्थ', 'नवशक्ति', मुंबई, १५–८–४९.








डॉ. वि. त्र्यं. गुणे

# महाराष्ट्रांतील न्यायसंस्था (इ. स. १३००–१८००)

मुंबई विश्वविद्यालयाच्या डॉक्टरेटपदवीकरितां, 'The Judicial system of the Marathas' नांवाचा प्रबंध सादर केला होता. त्यांतील पहिल्या ...त प्रकरणांत वर्णिलेल्या न्यायसंस्थांची अगदीं थोडक्यांत व साररूपानें येथें माहिती दिली आहे. त्यामुळें प्रस्तुत निबंधाचें स्वरूप नीट समजण्यास मूळ प्रबंधाची थोडक्यांत ओळख करून देणें जरूर आहे.

सदरील प्रबंधामध्यें एकूण आठ प्रकरणांचा समावेश झाला आहे. पहिल्या तीन प्रकरणांमध्यें राजसत्ताधिष्ठित न्यायसंस्थां (Royal Judicial Institutions) चें ऐतिहासिक व घटनात्मक दृष्टीनें विवेचन केलें आहे. चौथ्या प्रकरणामध्यें लोकरूढ (popular) न्यायसंस्थांची वरीलप्रमाणेंच माहिती दिली आहे. पांचव्यामध्यें न्यायविषयक कार्यपद्धति (Procedure) वर्णिली आहे. सहाव्यांत दंडमूल न्यायपद्धती-(Criminal justice)–विषयीं माहिती दिली असून प्रायश्चित्तपद्धतीचाहि त्याच प्रकरणांत समावेश केला आहे. सातव्या प्रकरणांत गुन्ह्यांचा शोध व कारागृहपद्धति यांविषयीं माहिती आली आहे. आठव्यांत एकंदर प्रबंधाचें थोडक्यांत तात्त्विक दृष्ट्या सारसंकलन केलें आहे.

देशांतील संस्थांमधून त्या देशांतील एकंदर परिस्थितीचें चित्र प्रतिबिंबित झालेलें असतें व त्यामुळें पहिल्या प्रकरणाच्या अगदीं प्रारंभास या ...चशें वर्षांतील महाराष्ट्राची एकंदर परिस्थिति वर्णिली असून त्यांत मुख्यतः सामाजिक संस्थांची रूपरेखा देण्याचा प्रयत्न केला आहे. अशा प्रकारें भौगोलिक, ऐतिहासिक, राजकीय, घटनात्मक, सामाजिक व धार्मिक अशा विविध दृष्टिकोनांतून या न्यायविषयक संस्थांची माहिती देण्याचा प्रयत्न या प्रबंधांत केला आहे.

सुमारें ६२० अस्सल निर्णयपत्रांच्या आधारें हा प्रबंध लिहिला असून स्वतंत्र दोन परिशिष्टांमध्यें त्यांचें विस्तृत पृथक्करण दिलें आहे. प्रबंधाची एकंदर पृष्ठसंख्या ३२५ आहे.

या न्यायसंस्था पुढीलप्रमाणें होत्या :

## मुसलमानींतील न्याय-संस्था

सुलतानीमध्यें एकंदर राज्यकारभाराविषयक दोन प्रकारच्या संस्था आढळून येतात : मध्यवर्ती सत्तेशीं संबंधित असलेल्या अथवा राजसत्ताधिष्ठित आणि लोकरूढ अथवा स्थानिक–पुरातन.

पहिल्या प्रकारच्या संस्थांचे कारभारदृष्ट्या पुनः दोन भाग होत : केंद्रीय व स्थानिक.

केंद्रीय मुख्य संस्थेस रखताना असें म्हणत. सुलतान व त्याची प्रभावळ–वझीर व अमीर–मिळून रखताना होत असे. सुलतान हा सर्वसत्ताधीश असून वझीर (प्रधान) व अमीर (नियुक्त अधिकारी) यांच्या साह्यानें एकंदर राज्यशकट चालवीत असे.

कारभाराच्या सोयीकरितां म्हणून एकंदर राज्याचे परगणा, तर्फ व मौजा असे विभाग पाडलेले असत. हे विभाग स्थानिक कारभाराकरितां म्हणून रखताऱ्याचे घटक वझीर व अमीर यांचेकडे मोकासा व जागीर या धाऱ्यानें दिलेले असत. मोकासदार व जागीरदार आपल्या ताब्यांतील प्रदेशाची व्यवस्था परगण्यास हवालदार व तर्फेस ठाणेदार नेमून चालवीत. याप्रमाणें रखताऱ्याचे घटक मध्यवर्ती सत्तेचे प्रमुख अधिकारी व स्थानिक कारभाराचे मुख्य अशा दोन प्रकारच्या अधिकारांत कार्य करीत







परगणा व तर्फेचा कारभार चालविणाऱ्या संस्थेस दिवाण म्हणत; व मध्यवर्ती मोकासदारानें अथवा जागिरदारानें नेमलेला हवालदार हा परगण्याच्या दिवाणाचा मुख्य असे. त्याच्या दिमतीस दुसरे दोन अधिकारी असत. त्यांना मुजुमदार व निवावन म्हणत. तर्फ अथवा 'ठाणा दिवाण'च्या मुख्यास ठाणेदार असें म्हणत. परगणा दिवाण व ठाणा दिवाण 'गोत' ह्या लोकरूढ संस्थेच्या साह्यानें, स्थानिक कारभार चालवीत असत.

मौजें अथवा गांव हा राज्यकारभाराचा शेवटचा विभाग होता. मोकदम हा गांवचा प्रमुख व सरकारी अधिकारी अशा विविध अधिकारांत गांवची व्यवस्था गांवगोताच्या साह्यानें पहात असे.

महत्त्वाच्या प्रश्नांचा निर्णय दिवाण व गोत एकत्रित बसून सभेद्वारें करीत. अशा सभेस 'मजलीस' म्हणत. राजकीय विभागानुरूप तीन प्रकारच्या मजलसी होत्या : परगणामजलीस, तर्फमजलीस व गांवमजलीस.

वादनिर्णयार्थ भरलेल्या परगणा—मजलसींतून पुढीलप्रमाणें सभासद आढळून येतात :

परगणा-दिवाणपैकीं पुढील अधिकारी मुख्यतः हजर असत :

(१) काझी, (२) हवालदार व (३) मजालसी.

राजसत्ता मुसलमानी असल्यानें काझी या मुसलमानी न्यायाधिकाऱ्यास अशा सभांतून प्राधान्य मिळत असे. तो मुसलमान समाजाचाही पण धार्मिक नेता असे. मजलसीच्या निर्णयपत्रां-('महजर') वर त्याच्या शिक्क्याची आवश्यकता असे. इतकेंच नव्हे, तर बहुतेक सर्व महत्त्वाच्या व्यवहारविषयक पत्रांवर त्याचा शिक्का आवश्यक असे. स्थानिक कारभारामध्यें, तसेंच धार्मिक बाबतींत त्यास महत्त्वाचें स्थान असल्यानें, दिवाण व गोत यांच्यामध्यें समझोता घडवून आणून सत्ता स्थिर करण्याच्या दृष्टीनें, मुसलमानी अंमलाच्या प्रारंभीं त्याचा बराच उपयोग झाला असावा असें आढळून येतें. हिंदू राजवटीमध्ये गांवसभा ह्या होत्या, सुलतानींत त्यापुढें जाऊन परगण्याची मजलीस अस्तित्वांत येण्यास कांहीं अंशीं हा अधिकार ( Office ) कारणीभूत झाला असावा असें वाटतें.

हवालदार हा परगण्याचा नियुक्त कारभारी होता. मजालसी हा विद्वान, धर्मशास्त्रज्ञ असून हिंदूंच्या न्यायविषयक प्रश्नांची चिकित्सा करणें व शक्य तें सरकारची बाजू संरक्षिणें हें सभेंतील त्याचें कार्य होतें.

परगणा-मजलीसमध्यें वरील दिवाणाच्या अधिकाऱ्याशिवाय पुढील गोतांचे प्रमुख आढळून येतातः (१) लोकांचे वंशपरंपरागत अधिकारी म्हणजेच देशक अथवा वतनदार (२) थळकरी अथवा मिरासदार—वंशपरंपरेनें जमीन कसणारे व जमिनीचे मालक; (३) प्रज, रया अथवा उपरी.

देशकांमध्यें पुढील अधिकाऱ्यांचा समावेश होई : (१) परगण्याचे देशमूख व देशपांडे, (२) समोवारच्या परगण्याचे देशमूख व देशपांडे, (३) परगण्यांतील गांवांचे मोकदम अथवा पाटील व कुलकर्णी, (४) ग्रामाचे सेवक कथवा बाराबलुते; (५) कसब्याचा अथवा व्यापारी गांव असल्यास शेटे महाजन व पेठ असल्यास पेठेचे २८ खूम ( व्यापारधंदा करणारी मंडळी अथवा वकाल. )

वरील प्रमाणेंच तर्फेचे दिवाण व गोत तर्फ—अथवा—ठाणा-मजलसींत बसत व गांवाचा मोकदम व गोत, मुख्यतः थळकरी कुळवाडिये गांवसभेंत बसत.

स्थानिक कारभार, न्यायनिवाडे, धार्मिक व जातिविषयक प्रश्न या सर्वांचा विचार या मजलसी करीत. व त्यांचे ते अधिकार सुलतानींत मान्य झालेले होते. या सभांचे परस्पर संबंध काय असत, हें निश्चित नाहीं. गांवाकडून न्याय मिळणें अशक्य झाल्यास ठाणा-मजलसीपुढें वादी उभा राही व तेथेंहि न जमल्यास परगण्यापुढें उभा राही; व तेथेंहि न्याय मिळत नाहीं असें झाल्यास अन्य परगण्याच्या अथवा तत्सम दुसऱ्या मजलसीकडे जाई.

तर्फ हा राजकीय विभाग परगण्याइतका विकास पावलेला नव्हता व उपलब्ध असलेल्यापैकीं बरेचसे महजर परगण्याचे मजलसीचेच आहेत.

बहामनी कालामध्यें परगण्यापेक्षां वरचा असा एक राजकीय विभाग असे व त्यावरील मुख्य अधिकाऱ्यास तर्फदार असें म्हणत. हेच तर्फदार बादशहाचे प्रधानहि असत. पंधराव्या शतकाच्या अखेरीस

बहामनी राज्य मोडकळीस आलें; तेव्हां तर्फदार सत्ताधीश होऊन स्वतंत्र बादशहा झाले. अर्थात् पुढें ही तर्फदारी पद्धति मागें पडली. तर्फदार निर्णय कसा करी हें उपलब्ध नाहीं.

या राजकीय संस्थांच्या बरोबरच न्यायनिर्णय करणाऱ्या लोकरूढ (popular) अशा पुढील संस्था होत्या :

( १ ) गोत, ( २ ) ब्रह्मसभा, ( ३ ) जातिसभा.

गोत ही संस्था पुरातन, परंपरागत व सुलतानींत विकास पावलेल्या धारापद्धतीं-(Sytem of tenures)-तून वतन, मिरास, प्रजं इत्यादींतून–निर्माण झाली होती. या धाऱ्यांच्या योगें भिन्न जमातींचें एकीकरण होऊन स्थानिक, राजकीय, धार्मिक, न्यायविषयक, जातिविषयक–कारभार पहाणारी गोत ही लोकांची संस्था निर्माण झाली.

परंपरागत हक्कांच्या तत्कालीन कागदपत्रांतील कांहीं वाक्प्रचारांवरून–उ० वतनभाऊ (=परंपरागत विशिष्ट अधिकार भोगणारे ते सर्व भाऊ), बिरादरभाऊ (=भागीदारीमुळें झालेले भाऊ) व घरभाऊ (=एकाच कुटुंबांतील भाऊबंद)–, गोत ही संस्था कौटुंबिक तत्त्वा–(family basis) वर आधारलेली होती असें आढळून येतें व यामुळें सदरील धारेकऱ्यांचें एक कुटुंबच तत्कालीन महाराष्ट्रांत निर्माण झालें होतें. यावरून महाराष्ट्रीयांचा वतनविषयक ओढा कां होता हें लक्षांत येईल.

राजकीय विभागानुरूप पुढीलप्रमाणें गोत-समूह आढळून येतात : परगणा-गोत, ठाणा-गोत, गांव-गोत. वर वर्णिल्याप्रमाणें दिवाण व गोत सभेद्वारें कारभार चालवीत.

गोताशिवाय ब्रह्मसभा व जातिसभा अशा आणखी दोन लोकरूढ अशा निर्णय करणाऱ्या संस्था होत्या. ब्रह्मसभा ही क्षेत्रांच्या ठिकाणीं असे. विद्वान् ब्राह्मणांचा तीमध्यें समावेश होई. धर्माधिकारी हा तिचा मुख्य असे. हिंदूंच्या व्यवहारविषयक प्रश्नांत जातिविषयक व धार्मिक बाबतींत ती सर्वश्रेष्ठ मानण्यांत येई. अपराध्याची धार्मिक व आत्मिक शुद्धि व्हावी म्हणून त्याकडून प्रायश्चित्त घेणें हें तिचें दुसरें महत्त्वाचें काम असे.

जातिविषयक प्रश्नांमध्यें जातिसभा श्रेष्ठ असे. जमा झालेल्या जातिसमूहास 'दैव' असें म्हणत. जातींच्या परंपरागत चालीरीतींचें संरक्षण करणें व अपराधी मनुष्यास जातिबाह्य करणें हें तिचें मुख्य कार्य असें.

वर वर्णिलेल्या न्यायविषयक द्विविध संस्था बहामनी कालखंडाच्या अखेरपर्यंत पूर्णपणें विकास पावल्या होत्या असें आढळून येतें. पुढील स्वतंत्र पांच-शाही राजवटींमध्येंहि त्या तशाच कार्य करतांना आढळून येतात.

## स्वराज्यांतील न्यायसंस्था

स्वराज्यामध्यें केन्द्रीय रख्तखान्याचें राजमंडळामध्यें रूपांतर झालें. या राजमंडळाची रचना कांहीं अंशीं हिंदू नीतिग्रंथांतून वर्णिलेल्या अष्टप्रधानमंडळाच्या धर्तीवर केलेली होती. राजमंडळाचे घटक हे सुलतानींतील रख्तखान्याचे वझीर व अमीर याप्रमाणें मोकासदार अथवा जागीरदार नव्हते, ते महाराष्ट्रराजे यांचे नियुक्त अधिकारी असून त्यांचें वेतन द्रव्यरूपानें निश्चित केलेलें होतें. शिवाजीराजे हे मोकासदारी व जागीरदारी–(सरकारसेवेबद्दल द्रव्याऐवजीं प्रांत लावून देणें)–पद्धतीच्या पूर्णपणें विरुद्ध होते.

राजमंडल हें राज्यकारभार व न्यायकारभार अशी दोन्हीं कार्यें करतांना आढळून येतें. गोतासह निर्णयार्थ बसलेल्या राजमंडळाच्या सभासदांना 'राजमुद्रा' असें उल्लेखिलें आहे. तेराव्या शतकांतील इंग्लंडचा राजा तिसरा हेन्री याच्या "कान्सीलियम रेजिस" व "क्यूरिया रेजिस" या दोन मध्यवर्ती संस्थांशीं राजमंडळ व राजमुद्रा कांहींशा जुळतात. मात्र या दोन इंग्रेजी संस्था सरंजामपद्धतीवर आधारलेल्या होत्या.

शिवाजी राजे यांनीं आपल्या राज्याचे तीन प्रमुख विभाग पाडले होते व कारभाराकरितां ते पंतप्रधान, अमात्य व मंत्री यांच्या स्वाधीन केले होते. या विभागांचे कारभाराच्या सोयीकरितां सरसुभे, सुभे अथवा परगणे व तर्फ आणि गांव असे विभाग पाडले होते. सरसुभ्याच्या कचेरीस "प्रांत राजमंडळ" असें म्हणत. सरसुभेदार हा आपल्या








विभागाच्या प्रधानास राज्यकारभारांत मदत करीत असे. सरसुभा हा बहुधा केवळ कारभाराचा भाग असावा; त्याचें स्वतंत्र असें उत्पन्न वगैरे होतें असें दिसत नाहीं. सुभा, तर्फ व गांव यांचा कारभार सुलतानींतील पद्धतीप्रमाणेंच सभांच्या द्वारें होत— असे. व दिवाण व गोत त्या सभांचे मुख्य घटक असत.

अष्टप्रधानांपासून ते थेट गांवाच्या मोकदमापर्यंत सर्वांचे अधिकार काबूजाबते घालून देऊन निश्चित केले होते व त्यांचें वेतनहि द्रव्यरूपानें निश्चित ठरलेलें असे. सुलतानींतील सरकारसेवेबद्दल प्रांत, मोकासा व जागीर धाऱ्यानें लावून देण्याची बंदी होती. तसेच वतनदाराचे हक्क द्रव्यरूपानें निश्चित ठरविले होते व सरकार तिजोरींतून त्यांना ते देण्यांत येत. रयतेपासून सदरील हक्क धान्य-अथवा-पदार्थ-द्वारा वसूल करण्याची सक्त मनाई होती. यामुळें या वतनदारवर्गावर जरब बसून त्याचें कार्यहि पूर्ववत् व्यवस्थित चालूं राहिलें होतें. परंतु रयतेचा संबंध दुरावल्यामुळें अर्थातच वतनदारांचें महत्त्व कमी होऊं लागलें. पुढें राजारामानें जरी मुसलमानींतील पद्धतीप्रमाणें त्यांचे सर्व हक्क त्यांच्या स्वाधीन केले तरी अठराव्या शतकांत वतनदारांना पुनः पूर्वस्थिति केव्हांच प्राप्त होऊं शकली नाहीं. अर्थातच गोत ह्या त्यांच्यावर आधारलेल्या संस्थेचें महत्त्वहि पुढें हळूहळू कमी होत गेलें.

मजलसीद्वारां निर्णय करण्याची पद्धति स्वराज्यांत १८ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत अस्तित्वांत होती. इतकेंच काय, परंतु वर उल्लेखिल्याप्रमाणें महाराष्ट्र-राज्यामध्यें केंद्रीय कारभारांतहि तिचा प्रवेश झाला होता. राजमंडळ व गोत हे एकत्रित सभाद्वारें निर्णय करतांना अनेकदा आढळून येतात. अशा सभेस हुजूर-हाजीर-मजलीस अथवा धर्मसभा असें म्हटलें आहे. शिवाजीमहाराज हजर असलेल्या अशा एका सभेंत सुमारें २३८ सभासद आढळून येतात. त्यांत २९ सरकारी अधिकारी आहेत. बाकीचे गोतापैकीं आहेत.

राजारामानें प्रासंगिक योजना म्हणून सरकारसेवे-बद्दल प्रांत मोकासा देण्याची प्रथा सुरू केली. पुढें शाहूराजे यांनीं ती तशीच चालू ठेवली. त्यांच्या कारकीर्दीच्या अखेरीस मराठी राज्य हें मोकासदारांचें व जागीरदारांचें राज्य झालें. जागीरदार आपल्या प्रदेशांत इच्छेनुरूप कारभार करूं लागले. लागद-पत्रावरून असें दिसतें कीं पहिले बाजीराव यांनीं प्रथमच आपल्या जागिरीच्या मुलुखांत 'पंचाईत' सुरू करण्याचा प्रयत्न केला. याप्रमाणें शाहू काळांत पंचाईत ही निर्णय करणारी संस्था हळूहळू अस्तित्वांत आली. इ. स. १७२६ मधील एका पत्रांतील पुढील वाक्य या दृष्टीनें विचारार्ह आहे : "मजलसीचाहि उबारा राहिला नाहीं."

शाहूराजे यांच्या पश्चात् पेशवे हे मराठी राज्याचे प्रमुख झाले. त्यांनीं आपल्या जागिरींतील कारभार, मामलेदार अथवा सुभेदार व कमाविसदार हे अधिकारी नेमून ते चालविण्याची प्रथा सुरू केली. मामलेदार व कमाविसदार हे स्वतंत्र तऱ्हेनें कारभार चालवीत. यामुळें पूर्वीची मजलसीद्वारा परगण्याचा व तर्फेचा कारभार चालविण्याची प्रथा बंद पडली. पहिले माधवराव यांच्या कारकीर्दीपर्यंत सदरील सरकारी अधिकाऱ्यांवर लक्ष रहावें म्हणून वतनदारांचा उपयोग होई. परंतु पुढें मक्ता देऊन प्रांताचा कारभार चालविण्याची प्रथा अस्तित्वांत आली. तेव्हां वतनदारांचें कांहींच काम उरलें नाहीं. मजलसीचें न्याय-निवाड्याचें काम पंचायतीकडे गेलें व अशा प्रकारें अठराव्या शतकांत मजलीस ही पुरातन संस्था मागें पडली. अर्थात् गोतांचेंहि काम संपलें व वतनदारहि निरुपयोगी ठरले.

पेशवे व त्यांचे सरदार, राजमंडळाचे जुने घटक आणि जुने सरदार यांनीं राज्यकारभारांत आपापल्या प्रांतांतून पेशव्यांचें अनुकरण केलें. व अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत मराठी राज्यांत बहुतेक सर्वत्र पंचायतद्वारा न्याय करण्याची प्रथा रूढ झाली, ती मराठी राज्याचे अखेरपर्यंत चालू होती.

मराठी राज्याच्या विस्ताराबरोबर अठराव्या शतकांत महाराष्ट्र-राज्य-संस्थापकानें सुरू केलेल्या राजमंडल व धर्मसभा या दोन महत्त्वाच्या संस्था मागें पडल्यानें एकंदर राज्यकारभाराचें व न्याय-पद्धतीचें एकीकरण होऊन केंद्रीभूत (centralised) अशी राज्यपद्धति अथवा न्यायपद्धति निर्माण होणें अशक्य झालें.








# महाराष्ट्रांतील न्यायसंस्था ( इ. स. १३००–१८०० )

## न्यायदानांतील कार्यपद्धति

पेशवेपूर्वकालीन महाराष्ट्रांमध्यें दिवाण व गोत यांच्या सभेद्वारा निर्णय करण्याची पद्धति सर्वमान्य झाली होती. सरकारी अधिकारी फक्त अंमलबजावणीचें कार्य करीत.

वादी आपल्या इच्छेनुरूप गांवापुढें, तर्फेस अथवा परगण्यास आपली तक्रार सादर करी. अमुकच ठिकाणीं त्यानें तीं दाखल करावी असा नियम नव्हता. सरकारी अधिकारी प्रारंभीं तक्रार लिहून घेत असे. नंतर देशमुख, देशपांडे अथवा पाटील-कुलकर्णी यांच्या साह्यानें गोत जमा करण्यांत येई. स्थानिक देवालयापुढील वडाच्या अथवा पिंपळाच्या पारावर सभा भरत असे. ज्येष्ठ व माघ या महिन्यांत सर्वांत जास्त सभा भरलेल्या आढळतात. शेतकरीवर्गास यावेळीं रिकामा वेळ असल्यानें हा काळ त्यांना सोयीचा होत असेल.

प्रसंगानुरूप देशमुख, पाटील व शेट्ये हे सभेच्या सभानायकत्वाचें कार्य करीत. वादींची बाजू विशद करण्यास वकील नसत; परंतु 'प्राश्निक' नांवाचा एक विद्वानांचा वर्ग सभेमध्यें हरदूवाद्यांच्या प्रश्नांची निरपेक्ष छाननी करीत असे. प्रासिद्ध क्षेत्रीं व स्थळीं हा वर्ग आढळून येतो. हरदूवाद्यांच्या उभयवाद्यांच्याकडून प्रारंभीं त्यांच्या तकरीरा घेण्यांत येत. पश्चिमवादी हजर नसल्यास त्यास सरकारी अधिकारी बोलावून आणी. त्याला 'तलब करून आणणें' असें म्हणत. नाईकवाडी, बेरड अथवा महार हें काम करी. तलब करून आणावयास पाठविलेल्या नाईकवाडीचा पोटखर्च प्रतिवादीस द्यावा लागे. त्यास 'मसाला' असें म्हणत. सभेपुढें उभा राहिल्यावर पश्चिमवादीस त्याजवरील आरोप वाचून दाखविण्यांत येत व त्याचें त्यावर उत्तर घेण्यांत येई. उपस्थित मुद्दे त्यानें अमान्य केल्यास सभेचें काम तसेंच पुढें चालूं राही. यानंतर सदरील सभेच्या निर्णयास आमची मान्यता आहे म्हणून उभयतांकडून 'राजीनामे' घेण्यांत येत. क्वचित् याविषयीं उभयतांकडून जामीन घेण्यांत येत असत, त्यास 'बर्तणूक-जामीन' असें म्हणत.

यावर हरदूवाद्यांच्या तकरीरांचा सभा विचार करी व त्यांना विचारावयाच्या प्रश्नांची यादी करण्यांत येई. त्यांवर उभयतांकडून येणाऱ्या उत्तरांना 'पुरसीस' म्हणत. मग एकंदर पुराव्याची छाननी होई.

तीन प्रकारचा पुरावा सामान्यतः स्वीकारीत : कागदपत्र, भोगवटा व साक्षी अथवा गोही. यांतून कोणताच पुरावा पुढें न आल्यास दिव्यावरून निर्णय करण्यांत येई.

दिव्याश्रय फारच क्वचित् केला जाई. 'रवा'—संज्ञक दिव्य महाराष्ट्रांत सुमारें ६०० वर्षें अव्याहत चालू होतें असें दिसतें. रवा–दिव्यामध्यें, पूर्ववादी तप्तधातूचा तुकडा उकळत्या तेला-तुपांतून बाहेर काढी. त्यानंतर हातास लाखोटा (सील) करीत व नंतर त्यास कारागृहांत ठेवण्यांत येई. तिसरे दिवशीं सभेपुढें पुनः त्यास उभा करीत व हात सोडीत. हातास कांहीं इजा झाली नसल्यास तो खरा होई; देवद्वारें व चंद्रसूर्यांसमक्ष खरा ठरला असें मानीत.

विजयी पक्षास पत्रक देत त्यास 'महजर' म्हणत. त्यावर सभेंतील सर्व सभासदांचीं नांवें व निशाण्या असत.

अंतिम निर्णयास सामान्यतः तीन ते चार सभांची जरूरी लागे. न्यायदानांत विलंब न होऊं देणें हें पहाणें सरकारी अधिकाऱ्याचें काम असे. अशा प्रकारें विलंब लागल्यामुळें वरच्या अधिकाऱ्याकडून त्याच्या दुय्यमास समज आल्याचीं शिवकालांतील तरी उदाहरणें उपलब्ध आहेत.

अंमलबजावणी करतांना सरकारी अधिकारी उभयवाद्यांकडून हरकी (हर्षानें दिलेली भेट) व गुन्हेगारी त्यांच्या ऐपतीप्रमाणें वसूल करी. कार्यपद्धतीचा व पैशाचा संबंध नव्हता.

गोतांना त्यांच्या श्रमांबद्दल मोबदला म्हणून जेवण व कापड मिळत असे. देशमुख, पाटील यांना शेलापागोटेंहि देत.

जेथें वाद निर्माण झाला असेल तेथेंच सभेमार्फत निर्णय करण्याचा सामान्यतः प्रयत्न होत असे. निर्णय करतांना हरदूवाद्यांमध्यें सौरस्य कायम टिकविण्याचा प्रयत्न होई. नियमांना तसें विशेष महत्त्व नव्हतें. एखाद्या वादीनें इच्छा दर्शविल्यास त्यास

अन्यत्र निर्णयार्थ पाठविण्यांत येई त्यास ' स्थल देणें ' असें म्हणत.

वरील मजलसीच्या कार्यपद्धतिप्रमाणेंच पंचाईतीचीहि कार्यपद्धति होती. हरदूवादी पंचांचीं नांवें सुचवीत. पंचांची संख्या तीनपासून पंधरापर्यंत व सीमावादामध्यें यापेक्षांहि अधिक असे. संबंधी सरकारी अधिकारी पंचांच्या बैठकी भरवी. त्यांच्या निर्णयास ' सारांश ' म्हणत. सरकारी अधिकारी ' सारांश ' मान्य करी व मग त्यावरून चिटणीसी खात्याकडून विजयी पक्षास ' निवाडपत्र ' देण्यांत येई. त्यावर सरकारी शिक्के असत. पंचांच्या सह्या नसत व त्यांचा उल्लेखहि त्यांत नसे. निवाडपत्र हें सरकारी पत्र होतें, तर महजर हा ' जानपदपत्र ' होतें.

तत्कालीन स्थानिक धारापद्धतीशीं जीवन अगदीं समरस झालें असल्यानें बहुतेक वाद वतन, मिरास यांविषयीं व व्यक्तींचे तद्‌द्भव हक्क व मानपान यांविषयीं झालेले आहेत.

## अपराध व दण्डपद्धति

अपराधांच्या दंडाविषयीं पुढील माहिती उपलब्ध झाली आहे. अतिसाहसी मनुष्यास पुढीलप्रमाणें तीन प्रकारच्या शिक्षा भोगाव्या लागत, तेव्हां तो दोषमुक्त होई.

(१) राजदण्ड अथवा दिवाणदण्ड, (२) देवदण्ड, (३) जातिदण्ड. सरकारी शिक्षेस दिवाणदण्ड म्हणत. धार्मिक व आत्मिक दोषपरिमार्जनास देवदण्ड म्हणत व जातिदण्ड ही एक प्रकारची सामाजिक शिक्षा होती.

दिवाणदण्डाची अंमलबजावणी सरकारचे अधिकारी करीत व दुसऱ्या दोन दंडांची अंमलबजावणी अनुक्रमें ब्रह्मसभा व जातिसभा या करीत.

अतिसाहसी मनुष्य हा जातिबाह्य समजण्यांत येत असे. सरकार त्यास द्रव्यदंडाची अथवा कारावासाची योग्य ती शिक्षा देत असे. ती भोगल्यावर तो क्षेत्रींच्या ब्रह्मसभेकडे जाई व ब्रह्मसभेस शुद्धीकरणविषयक विनंति करणारें दिवाणाचें पत्र सादर करीत असे; देवदंड अथवा प्रायश्चित्त घेतल्यावर ब्रह्मसभेचें शुद्धिपत्र घेऊन जातिसभेपुढें उभा रहात असे. जातिव्यवहारास पात्र होण्याकरितां त्यास जातीस भोजन द्यावें लागे, त्यासच जातिदंड म्हणत.

जातिस्वीकाराच्या या प्रकारास वरिष्ठ वर्गांतून ' पंक्तिपावन ' करणें असें म्हणत व इतर वर्गांतून ' गोताई करणें ' असें म्हणत.

अपराधी मनुष्यास शासन करणें हें सरकारचें काम समजलें जाई. सरकारी अधिकारी गुन्ह्यांचा शोध नाईकवाडी व प्यादी यांच्या साह्यानें करीत. त्यांना शिक्षा देण्याचें काम मुख्यतः मध्यवर्ती अधिकाऱ्याचें असे. महत्त्वाच्या गुन्ह्यांच्या निर्णयांत मध्यवर्ती सत्ता सर्वश्रेष्ठ मानली जाई.

या न्यायदान करणाऱ्या संस्था व त्यांची कार्यपद्धति या मार्गे तत्कालीन न्यायशास्त्राची ( jurisprudence ) विशिष्ट तात्त्विक विचारसरणी होती, तिचा विचार या प्रबंधांत केलेला नाहीं. फक्त ऐतिहासिक व वर्णनात्मक दृष्टीनें येथें या संस्थांचा विचार केला आहे.

## पौर्वात्य न्यायसंस्थांचें वैशिष्ट्य

वरील विवेचनावरून, मध्ययुगीन महाराष्ट्रांतील न्यायसंस्थांच्या तात्त्विक भूमिकेविषयीं स्थूलमानानें पुढीलप्रमाणें अनुमानें करतां येतात.

मजलीस व पंचाईत या न्यायसंस्थांवरून ही गोष्ट उघड होते कीं, समुदायद्वारें निर्णय करण्याची पद्धति त्या कालीं मान्य झालेली होती. या उलट सांप्रत आढळून येणारी एकाच व्यक्तिद्वारा निर्णय करण्याची पद्धति रूढ नव्हती. यामुळें अर्थात् क्रमबद्ध अशी सांप्रतच्याप्रमाणें कोर्टांची वाढ होणेंहि त्या काळीं शक्य नव्हतें. एकाच नियुक्त अधिकाऱ्यामार्फत निर्णय करण्याची पद्धति ( Justice by a single individual ) पाश्चिमात्य देशांतून अर्वाचीन युगांत प्रामुख्यानें पुढें आल्याचें आढळून येतें. व तीच पद्धति पुढें पारतंत्र्यांत आपल्या देशांत रूढ करण्यांत आली.

मजालसी अथवा समासद हा न्यायदान करणारा सरकारी अधिकारी असे व त्याचें कामहि सभा चालू असतां कायद्याचें स्पष्टीकरण करणें हें असावें. न्यायाधीश ही संज्ञा स्वराज्यागमनानंतर अस्तित्वांत

आली व मध्यवर्ती मजालसीस न्यायाधीश म्हणू लागले, असें दिसतें.

कार्यपद्धति (Judicial procedure) सर्वत्र एकच प्रकारची होती. स्मृतिविहित पद्धतीशीं ती बरीच सदृश होती. विशेष हा कीं, तत्कालीन सामाजिक जीवनाशीं ती अगदीं एकरूप पावली होती. न्यायदान करतांना व्यक्तीस प्राधान्य दिलें होतें व शक्य तोंवर व्यक्ती-व्यक्तींमधून सौरस्य टिकविण्याचा प्रयत्न होई. न्यायविषयक नियमांना दुय्यम स्थान होतें. सांप्रत याच्या अगदीं उलट प्रकार आढळून येतो.

वादीची बाजू मांडण्यास वकील नव्हता. वकील ही संस्थाच मुळीं पाश्चिमात्य न्यायशास्त्रांतून पुढें आली आहे. त्या देशांतून ती हितावहहि झाली; कारण तिकडील एकंदर परिस्थितीशीं व न्यायपद्धतीशीं ती जुळती अशीच होती. इकडे वकील नसला तरी महाप्राश्निकांचा वर्ग कांहीं अंशीं त्याचें कार्य करी, हें वर आलेंच आहे.

सांप्रतप्रमाणें कार्यपद्धति व कोर्ट-फी यांचा परस्परसंबंध नव्हता. न्यायाची अंमलबजावणी करतांना ऐपतीप्रमाणें हरदूवाद्याकडून 'हरकी', 'गुन्हेगारी' वसूल करण्यांत येत असे.

राजदण्ड, देवदण्ड व जातिदण्ड या शिक्षापद्धतीवरून अतिसाहसी मनुष्याची केवळ गुन्हेगार म्हणून आजच्याप्रमाणें वासलात न लावतां समाजाचा तो घटक आहे व त्याची कायिक, वाचिक व मानसिक सुधारणा होणें जरूर आहे याकडे अधिक लक्ष दिलें होतें हें स्पष्ट दिसून येतें.

तत्कालीन न्यायशास्त्र (Maratha Jurisprudence) मुख्यतः पुढील तीन गोष्टींवर आधारलेलें होतें : स्मृतिविहित धर्मशास्त्र, विविध जातींच्या परंपरागत चालीरीती, व सुलतानींत विकास पावलेली धारापद्धति (System of tenures) आणि तदुद्भव व्यक्तीचे विशिष्ट अधिकार (Laws of personal status).

निर्णयाची कार्यपद्धति (Procedure) व प्रायश्चित्तपद्धति या स्मृतिनियमांवर आधारल्या होत्या. जातींचे नियम हे त्यांच्या परंपरागत चालीरीतींवर अवलंबून होते. धारापद्धतीचे शिरस्ते (Laws of tenures) व तींतून निर्माण झालेलें व्यक्तीचे विशिष्ट अधिकार हे मुसलमान पद्धतीचें वैशिष्ट्य होय. समकालीन पाश्चिमात्य देशांतील न्यायपद्धतींतहि अशा प्रकारचे कायदे आढळून येतात. मध्ययुगीन न्यायपद्धतींचें तें एक वैशिष्ट्यच आहे.

सारांश, सामाजिक, धार्मिक, राजकीय व आर्थिक परिस्थितीशीं जुळती अशी ही न्यायपद्धति होती व त्यामुळें लोकांच्या अंगीं चांगलीच मुरलेली होती.

गेलीं सव्वाशें वर्षें हा देश पारतंत्र्यांत होता. ब्रिटिशांनीं आपल्या भूमीतील न्यायसंस्था येथें सुरू केल्या. श्री. ना. गो. चापेकर यांनीं आपल्या एका लेखांत 'प्रचलित न्यायपद्धति ही एका निर्जीव यंत्राप्रमाणें वाटते' असें म्हटलें आहे. तेव्हां गेल्या सव्वाशें वर्षांत पाश्चिमात्यांच्या न्यायसंस्था आपल्या अंगवळणीं पडल्या नाहींत हें उघड आहे. व्हिनोग्राडाफ या सुविख्यात न्यायशास्त्र (Jurisprudence)-पंडिताच्या मतें, पूर्वेकडील संस्था (institutions) पाश्चिमात्य पद्धतीपासून अगदीं भिन्न अशा तत्त्वप्रणालीवर आधारल्या असल्यानें त्यांचा स्वतंत्र अभ्यास होणें जरूर आहे.

आपल्या देशांतील सामाजिक परंपरा व आर्थिक परिस्थिति विचारांत घेऊनच आपल्याला नवीन भारतवर्ष निर्माण करावें लागेल.

---

श्री. जव्हेरभाई पटेल

# आजचें युग

आजच्या या विज्ञानयुगांत गांधीजींनीं प्रेरित केलेलें विकेंद्रित स्वरूपांतील खादी, ग्रामोद्योग ह्यांचे कार्यक्रम कितपत चालू शकतील असा प्रश्न नेहमींच हरएक मनुष्याला त्रास देतो. ह्या प्रश्नांतून ध्वनि असा निघतो कीं आजचा जमाना प्रगत झाला आहे व तो प्रगतिसूचक असल्यामुळें गौरवास्पद आहे. ह्या प्रश्नापुढें विकेंद्रित स्वरूपांतील ग्रामोद्योग कुंठित, अकार्यक्षम आणि प्रगतिघातक प्रतीत होत आहेत व म्हणूनच निष्फळ आहेत. आतां प्रतिप्रश्न असेही विचारतां येतात कीं आजचा जमाना खरोखरच गौरवास्पद आहे का, ग्रामोद्योग खरोखरीच निरर्थक,बेकार आहे कां? किंवा ह्या दोहोंमध्यें मूलतःच खरा विरोध आहे?

प्रथम विचार करण्यासारखा प्रश्न तर हा आहे कीं हें युग विज्ञानाचें आहे का विज्ञान्याचें आहे? विज्ञानयुगाच्या उद्घोषांच्या कोलाहलांत हा भेद पुष्कळांच्या लक्षांत येत नाहीं. निर्मेळ विज्ञान पवित्र असतें, उपकारक असतें व अनुकरणीय असतें. विज्ञान ही एक महान् शक्ति आहे. परंतु विज्ञानी ह्या शक्तीचा सदुपयोगच करतील असा भरंवसा काय? शक्तीचा उपयोग, तो करणाराच्या हेतूवर निर्भर असतो. आम्हांस माहीत आहे कीं,

विद्या विवादाय धनं मदाय<br>
शक्तिः परेषां परपीडनाय।<br>
खलस्य साधोर्विपरीतमेतत्<br>
ज्ञानाय दानाय च रक्षणाय॥

ह्या युद्धांत विज्ञानाचा उपयोग विज्ञान्यांनीं कसा केला आहे हें का सांगावें लागतें? युद्धाच्या अखेरीस चर्चिलमहाशयांचें एक महावाक्य येथें स्मरण करण्यासारखें आहे. त्यांच्या म्हणण्याचा आशय हा कीं विज्ञान्यांच्या बुद्धीचा विकास फार पुढें गेलेला पण त्यांचें हृदय फार संकुचित झालें आहे, त्यांच्या राक्षसी डोक्यापुढें त्यांची विवेकशक्ति लहान अर्भकाप्रमाणें भासते! जणूं काय विवेकशक्तीच्या त्या छोट्या अर्भकाला विज्ञानाच्या आविष्काराच्या चपळ घोड्यावर बसवून त्या घोड्यास विज्ञानाचा चाबूक फटकारला आहे. बिचारा अर्भक त्या घोड्यास ताब्यांत कसा ठेवणार? त्याचें हाड न् हाड खिळखिळें होऊन जाईल. हीच दुर्गति विज्ञान्यांच्या विवेकाची, त्यांच्या डोक्याच्या बाबतींत झाली आहे. आणि त्याचें कारण असें कीं, विज्ञानाचा सदुपयोग होण्यापेक्षां त्याचा दुरुपयोगच अधिक झाला आहे. दुसऱ्या भाषेंत बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं विज्ञानाच्या आविष्कारांचा फायदा विज्ञान्यांच्या साहाय्यानें कांहीं व्यक्तींनीं घेतला. त्या अर्थानें विज्ञान्यांच्या स्वार्थांधतेमुळें आणि मूर्खतेमुळें विज्ञान आज विज्ञान्यांचा दास झालें आहे आणि विज्ञानी केवळ भाडोत्री पंडित बनले आहेत! ह्या अर्थी आजचें युग विज्ञानाचें नसून व्यक्तिविशेषांचें आहे. विज्ञानानें केवळ मोठमोठीं यंत्रें निर्माण केलीं; येवढेंच नव्हे तर त्या यंत्राप्रमाणें अत्यंत महत्त्वाकांक्षी व्यक्तिविशेषही पैदा केले आहेत. आजचें युग गौरवास्पद असेल तर तें ह्याच महाशयांच्या दृष्टीनें तसें आहे. जनसमुदायाची सेवा विज्ञानाच्या दृष्टीनें व्हावयाची अजून राहिलीच आहे. आणि ह्याच कारणासाठीं आजचें युग गौरवास्पद व्हावयाचेंहि राहिलें आहे. तें गौरवास्पद तेव्हांच होईल कीं जेव्हां तें कांहीं व्यक्तिविशेषांचें नसून साधारण जनतेचें होईल.








# आजचें युग

महर्षि अरविंद यांनीं एका कलाविषयक लेखामध्यें आजच्या जमान्याचें एक चित्र रेखाटलें आहे. ते म्हणतात, आजचा जमाना धातूच्या पुतळ्याचा नसून कागदी चित्रांचा आहे. हरएक जमाना—हरएक युग आपआपल्या भावनेचें प्रतिबिंब म्हणून कलेची निर्मिति करीत असतें. धातूचा पुतळा करावयाचा असल्यास उद्दिष्टाचें यथार्थदर्शन, भावनेची स्थिरता व गंभीरता, चित्ताची एकाग्रता आणि चिकाटीचा प्रयत्न ह्या गुणसंपदेनें युक्त अशी मनःस्थिति राहिली पाहिजे. कागदाचें चित्र बनवायचें असेल तर त्या गुणांची अपेक्षा नसते. वेग, चंचलता, अस्पष्ट दर्शन व भावना ह्या कागदी चित्राचें प्रतीक आहेत. त्यांत कल्पनेचें क्षेत्र विस्तृत असतें हें खरें; पण त्यायोगें जीवन समृद्ध होत नाहीं. धातूच्या पुतळ्याच्या मनोवृत्ति असणारांचें जीवन जितकें टिकाऊ असतें तितकेंच कागदी चित्राची मनोवृत्ति असणारांचें जीवन क्षणजीवी असतें. आज हीच दशा आपणांस दृष्टोत्पत्तीस येते. व्यक्तिविशेषांचें स्थान तर आपण पाहिलेंच आहे. जनसमुदायाची स्थिति आपण पाहिली पाहिजे. जोंपर्यंत धातूचे पुतळे त्यांच्यासमोर येत होते तोंपर्यंत त्यांची संख्या मर्यादित असल्याकारणानें त्यांचें निरीक्षण-परीक्षण करण्याची आणि आपल्या विवेकशक्तीचा सल्ला घेण्याची फुरसत लोकांना मिळत असे. कागदी चित्रांनीं जगाला हंगामी मेळ्याचें स्वरूप आणून दिलें आहे. चमकदार, भडक, आकर्षक अशा अनेक वस्तूंचें प्रदर्शन होतें व धांदलीचें व प्रक्षोभाचें वातावरण तेथें निर्माण केलें जातें. कोणती वस्तु खरेदी करावी, कोणती करूं नये, उपयुक्त कोणती व अनुपयुक्त कोणती, कोणती वस्तु खरी, कोणती नकली—या गोष्टींची चौकशी करण्याला किंवा ह्याबद्दलचा विचार करावयाला देखील तेथें सवड नसते. ह्या प्रक्षुब्ध वातावरणामुळें मेळ्यांत किंवा जत्रेंत जाणारांची मनःस्थिति लहान मुलांसारखी होते. मूल बाजारांत जातें तेव्हां प्रथम तें अमुक एक वस्तु खरेदी करण्याचा निर्णय करून जात नाहीं. जी वस्तु बालक पाहतें, ती घेण्यास तें पालकास सांगतें. विज्ञानाच्या साहाय्यानें विज्ञानाचा उपयोग व्यक्तिविशेषांनीं बाजाराचें किंवा यात्रेचें स्वरूप देण्यांत केला व त्यापुढें अखिल जनता आपली विवेकशक्ति अजमावण्याचें विसरून गेली. वस्तूंच्या भरमसाटपणाचा भडिमार त्यांच्यावर होऊं लागला. ह्या विषयांत शिकले सवरलेले लोक व अशिक्षित लोक ह्यांच्यामध्यें कांहीं विशेष फरक दिसून येत नाहीं. फरक असेल तर तो इतकाच कीं अशिक्षित लोकांपेक्षा शिकलेसवरलेले लोक व्यक्तिविशेषांच्या प्रचाराच्या आहारीं सहज जातात. ज्याप्रमाणें इंग्रजी शिक्षणानें शिक्षित झालेले लोक इंग्रजी राज्याला आयतेच कारकून मिळाले, त्याचप्रमाणें शिकले-सवरलेले लोक स्थापित हितांच्या प्रचाराचें आयतें साधन बनले. त्यांची विवेकशक्ति व अशिक्षितांची विवेकशक्ति यांमध्यें फरक राहिला नाहीं. ह्याप्रमाणें साऱ्या जनसमुदायाची मनोदशा उत्तेजित, पंगु व भोळीभाबडी (credulous) बनून गेली. ही दशा गौरवास्पद आहे का गौरवहीन ! विज्ञानाचे आविष्कार गौरवास्पद असोत वा व्यक्तिविशेषाचा विकास गौरवास्पद असो, परंतु जनसमुदायाची मनोदशा तर गौरवहीनच आहे !

लेखाच्या आरंभीं आम्हीं जो प्रश्न निर्माण केला त्याचें उत्तर ह्याच भूमिकेंतून मिळेल. ग्रामोद्योग आज जर चालत नसतील तर आजचा जमाना गौरवहीन आहे म्हणून; ग्रामोद्योग शक्तिहीन किंवा कमताकद आहे म्हणून नव्हे !

वरील विवरणाचीं कांहीं उदाहरणें देतां येतील. विज्ञानानें दुधांतून केसीन बनविण्याची क्रांति सुचविली आहे. केसीनमधून बटणें, फण्या, कंगवे, फौंटनपेनच्या केसिस वगैरे निरनिराळ्या महागऱ्या वस्तू बनूं शकतात. आजकाल अनेक ठिकाणीं दुधांतून मलई काढण्याचीं यंत्रें ठेवून खेड्यांतून दूध खरीदलें जातें. मलईचें लोणी शहरांत विकण्यासाठीं पाठविलें जातें व मलई काढलेल्या दुधांतून केसीन तयार केलें जातें. मलई आणि केसीन ह्या दोहोंतून बरेंच उत्पन्न होत असल्यामुळें दूध विकत घेणारे व्यापारी कास्तकारांना—शेतकऱ्यांना दुधाचा भाव चांगला देऊं शकतात. शेतकरी जर आपल्या घरीं दधिमंथनाच्या पुरातन पद्धतीनें तूप तयार करीत असले तर त्यांना तेवढ्याच दुधाचे पैसे








कमी मिळतात. ताकांत लोण्याचें प्रमाण राहून जातें व तें ताकहि खेडेगांवांत जवळ जवळ फुकटच वांटले जातें. आतां ह्या दोन पद्धतींत चांगली किंवा पसंत करण्यासारखी पद्धति कोणती? दुसऱ्या पद्धतीप्रमाणें दुधांतले सर्व भाग खाण्याच्या कामीं उपयोगांत आणले जातात. पहिल्या पद्धतींत केवळ मलई खाण्याच्या कामीं आणली जाते आणि दुधांतील प्रोटिन—जें खाद्यवस्तूंतील एक महत्त्वाचें द्रव्य आहे—तें खाद्य पदार्थ ह्या दृष्टीनें वाया जातें. यांत विज्ञानानें काय साधलें? खाद्यवस्तूंतील महत्त्वाचें द्रव्य बिघडून टाकलें. आपण विचाराल कीं विज्ञानाचा हा आविष्कार करण्यांत काय बिघडलें? आविष्कार झाला ह्यांत बिघडलें नाहीं. विज्ञानानें आपलें कार्य करावें. त्यांत दोष कसला? परंतु विज्ञानाचा उपयोग कोठें, किती करावा हाच तारतम्यबुद्धीचा प्रश्न आहे. जनसमुदायाच्या हिताचा विचार करणारे म्हणतील : "विज्ञानानें हा आविष्कार करून ठेवला हें ठीक झालें. प्रसंग पडल्यावर ह्या ज्ञानाचा फायदा घेतां येईल. आज तर हिंदुस्थानांत प्रत्येक माणसामागें सरासरी पांच औंस दूध पडतें; उलट आहारशास्त्रास अनुसरून प्रत्येक माणसास सोळा औंस दूध मिळालें पाहिजे. म्हणून आज तर विज्ञानाच्या ह्या आविष्काराचा लाभ घेण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. परंतु ईश्वराच्या कृपेनें उद्यां आम्हीं खपवूं शकणार नाहीं इतकें विपुल दूध निर्माण झालें व तें फेकूनच द्यावें लागलें, इतकेंच नव्हे तर त्याचा दुर्गंधहि सहन करावा लागला तर मात्र हा आविष्कार आम्हांला आशीर्वादरूप व लाभदायक ठरेल. परंतु अशी वेळ येईपर्यंत दुधाचा पूर्ण उपयोग खाण्याच्या कामीं करण्याचाच सल्ला आम्ही देऊं". विज्ञानाचा उपयोग करून घेणारे व्यक्तिविशेष म्हणतील : "हें शास्त्रीय-वैज्ञानिक युग आहे. विज्ञानाच्या आविष्कारानें शेतकऱ्याला अधिक पैसा मिळत आहे, आणि शौकी लोकांना केसीनपासून तयार झालेले पदार्थ मिळतात. दधिमंथनानें तूप काढण्याची क्रिया इतकी कार्यक्षम नाहीं. ताकांत लोणी राहूनच जाते आणि ताकांतून केसीनप्रमाणें कांहीं उत्पन्न होत नाहीं. म्हणूनच ही पद्धति अर्थोत्पादक नाहीं आणि त्यामुळेंच टिकाऊ नाहीं." ह्याचा निकाल कोण करणार? परंतु निकाल लावण्यासाठीं कांहीं कसोटी मात्र आम्हांस सुचवितां येईल. एक तर हा निर्णय 'बहुजनसुखाय बहुजनहिताय' झाला पाहिजे; आणि दुसरी गोष्ट म्हणजे कार्यक्षमतेचा विचार हेतूच्या दृष्टीनें झाला पाहिजे. केसीन बनवावयाचें असेल, तर मलई काढण्याचा प्रकार अर्थातच कार्यक्षम बनला पाहिजे. ताक प्यावयाचें असेल तर थोडें तूप निराळें खाल्लें काय किंवा ताकांतून खाल्लें काय, सारखेंच.

विज्ञानाच्या ह्या युगांतहि जनतेचें मन किती भोळेंभाबडें राहिलें आहे हें पाहण्यासाठीं वनस्पति-तुपाचें उदाहरण पुरेसें आहे. केवळ प्रचाराच्या जोरावर आज वनस्पति तुपाचा व्यवहार बेसुमार वाढला आहे; आणि शिकले-सवरलेले लोकहि ह्या प्रचारास बळी पडले आहेत. प्रचाराचा प्रकारहि पाहण्यासारखा आहे. आम्हांस असें सांगण्यांत आलें कीं, "खाण्याच्या तेलाला रंग व वास असला तरी तें खावें लागतें हा निसर्गाचा आपणांवर केवढा जुलूम आहे? विज्ञानानें ह्या जुलमांतून आपणांस सोडविण्याचा मार्ग शोधून काढला आहे. त्याचबरोबर तें चांगल्या स्थितींत टिकून राहील असाहि प्रयत्न झाला आहे. फार काय सांगावें, तेलाला तुपाचें स्वरूपहि प्राप्त करून देण्यांत आलें आहे. चला! विज्ञानाच्या ह्या सेवेचा लाभ अवश्य घ्या!" मानसशास्त्राचा एक नियम असा आहे कीं, एक गोष्ट वारंवार सांगण्यांत आली कीं तिचा परिणाम आपणांवर अवश्य होतोच. आणि दुसरा नियम असा आहे कीं, कांहीं सूचना (Suggestion) माणसास दिली कीं, वस्तूंत कांहीं तथ्य असो नसो, माणसाच्या डोक्यावर त्याचे आघात होतच जातात. आपली मेंढी खांद्यावर घेऊन जाणाऱ्या एका ब्राह्मणाला लोकांच्या सांगण्यावरून मेंढीच्या जागीं आपण कुत्रा घेऊन चाललों आहोंत असें भासल्याची गोष्ट आम्हीं लहानपणीं वाचली आहे. तेलाचा रंग आणि वास यांच्या जुलमाचा, जोंपर्यंत ह्या परोपकारी महाशयांनीं ज्ञान करून दिलें नाहीं तोंपर्यंत, आम्हांला पत्ताहि नव्हता. आम्हांला तर उलटच गोष्ट माहीत होती. रूप आणि गंध ह्याला








# आजचें युग

आम्हीं दूषण न समजतां भूषणच समजत होतों. विकत घेतांना तेल हातावर चोळून त्याचा विशिष्ट आणि परिचित वास आम्ही घेत होतों आणि त्यानें आम्हांस समाधान होत होतें. जवसाच्या व सरसूच्या तेलाचा वास किती उग्र असतो ! परंतु हें तेल ज्यांनीं खाल्लें त्यांना त्याच तेलाची गोडी पटते. परंतु आतां समाजांतील कांहीं लोकांना—विशेषत: शिकल्यासवरलेल्या लोकांना—रूप आणि गंध हीं त्रासदायक वाटूं लागलीं. संभव आहे कीं ह्या युक्तिवादाचा क्षेत्रविस्तार करून तो वाटेल त्या थराला जाईल. भाजी अथवा डाळ यांचें रूप व गंध आपणांस आज पसंत आहे तो विज्ञान्यांच्या प्रचारामुळें नापसंत होण्याचाहि संभव आहे ! ही कल्पना ओढूनताणून विपर्यस्त केली आहे असें समजण्याचें कारण नाहीं. गहूं व तांदूळ यांच्या बाबतींत तर ही गोष्ट सिद्ध झाली आहे. ह्या दोन्ही धान्यांचा गंध व रूप हीं आहारशास्त्राच्या दृष्टीनें कितीहि फायदेशीर असोत; परंतु उच्च राहणीच्या लोकांना तीं कोठलीं पसंत पडणार ?

ह्या प्रकारें विज्ञानानें आविष्काराच्या द्वारा प्रगति अवश्य दाखविली आहे. पण जनसमुदायाचें मन जसेंच्या तसें भोळें भाबडें राहिलें आहे. ह्या दृष्टीनें आजचें युग गौरवास्पद नाहीं. ह्या आविष्कारांच्या पूर्वी अशा भोळ्या बुद्धीच्या लोकांचा फायदा घेतला जाण्याचे प्रसंग कमी येत असत. ह्या अर्थानें हें युग विज्ञानाचें नसून जाहिरातबाजीचें आहे.

आतां आपणच सांगा कीं ह्या युगांत ग्रामोद्योग चालणें शक्य आहे कीं नाहीं ? त्याचा पूर्ण आधार आपल्या जीवनदर्शनावर अवलंबून आहे. आपण तूप आणि ताक खाऊं इच्छीत असाल तर ग्रामोद्योग चालू शकेल. खाण्याच्या ऐवजीं शोभिवंत बटनें हवीं असतील तर ग्रामोद्योग चालणार नाहीं.

'प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरं' हा न्याय आपणांस पटत असेल व आपल्या बुद्धीवर आपला भरंवसा असेल, तर आपण तेलघाणीचें ताजें तेलच खाल आणि परबुद्धीवर आपला विश्वास असेल तर बिघडल्यानंतर सुधारलेली, दिसण्यांत सुरेख परंतु आहारतत्त्वाच्या दृष्टीनें नि:सत्त्व अशी वस्तु म्हणजे वनस्पति–घी–वनस्पतीचें तूप आपण खाल.

सारांश, आपण भोळेभाबडे रहाल, तर ग्रामोद्योग चालणार नाहीं. नीरक्षीरविवेक करावयाचा असेल तर ग्रामोद्योग बहुतांशीं चालेल.

---

## "आम्हीं फाळणीला मान्यता कां दिली ?"

हिंदुस्थाननें आपल्या फाळणीला मान्यता देणें म्हणजे श्री. जिना यांच्या द्विराष्ट्रवादाच्या सिद्धांताला मान्यता देणेंच होय अशा प्रकारच्या परदेशी वृत्तपत्रांतील पत्रकांचा उल्लेख करून पं. जवाहरलाल नेहरू म्हणाले, "हें एक आश्चर्यकारक विधान होय ! हिंदुस्थानांत आम्ही आजपर्यंत केव्हांहि द्विराष्ट्रवादाचा सिद्धांत मान्य केलेला नाहीं; आणि यापुढेंहि कधीं मान्य करणार नाहीं. आम्हीं फाळणीला मान्यता कां दिली ? तर संघर्ष, अराजक माजेल आणि स्वातंत्र्य लांबणीवर पडेल तीं टाळण्यासाठीं. त्या त्या प्रांतिक कायदे-मंडळांतील निवडक प्रतिनिधींच्या मतानें हा प्रश्न सोडवावा हें आम्हीं मान्य केलें. पण या प्रश्नाचा जर जनतेच्या मतानें निर्णय घेतला असता तर अधिक बरें झालें असतें. आम्हीं मान्य केला तो द्विराष्ट्रवादाचा सिद्धांत नसून, तो निवडून आलेल्या प्रतिनिधींच्या द्वारें व्यक्त झालेला जनतेचा निर्णय होय. आम्हीं जर द्विराष्ट्रवादाचा सिद्धांत मान्य केला असता तर हिंदुस्थानांत चार कोटी मुसलमान परके झाले असते !"

—काश्मीर राष्ट्रीय परिषदेच्या अधिवेशनांत ता. २४–९–१९४९ रोजीं केलेल्या भाषणांतील उतारा. [ प्रे. ट्र. ऑफ इं. ]

प्राचार्य वा. वि. मिराशी

# हेमाद्रीचा अंतकाल

रामदेवराव यादवाचा करणाधिप व चतुर्वर्ग-चिन्तामणि इत्यादि संस्कृत ग्रंथांचा कर्ता हेमाद्रि किंवा हेमाडपंत याचें नांव सुविख्यात आहे. यानें विद्वानांना उदार आश्रय दिला, स्वतः अनेक विषयांवर ग्रंथरचना केली, मोडी लिपि प्रचलित केली व स्वतःच्या नांवानें पुढें प्रसिद्ध झालेली 'हेमाडपंती' स्थापत्यपद्धति प्रचारांत आणली. या विविध कामगिरीमुळें त्याचें नांव भारतीय इतिहासांत चिरस्मरणीय राहील. असा हा महापण्डित यादवनृपति महादेव व रामदेव यांच्या दरबारीं, त्यांचा करणाधिप किंवा लेखनाध्यक्ष व मन्त्री म्हणून होता असें त्याच्या स्वतःच्या व त्याचा आश्रित बोपदेव याच्या ग्रंथांतील उल्लेखांवरून दिसतें. त्यावरून तो इ. स.च्या तेराव्या शतकाच्या द्वितीयार्धांत होऊन गेला यांत संशय नाहीं. त्याच्या आयुष्यांतील इतर घटनांविषयीं मात्र आपणांस विशेष माहिती नाहीं. पण अलीकडे डॉ. कोलते यांनीं महानुभावी वाङ्मय व महिकावतीची बखर यांतील कांहीं उल्लेखांवरून त्याच्या अंतकाळच्या प्रसंगावर प्रकाश पाडला आहे त्याविषयीं थोडक्यांत चर्चा प्रस्तुत लेखांत करावयाची आहे.

## हेमाद्रीच्या अंतासंबंधीं डॉ. कोलते यांचें मत

'नागपूर युनिव्हर्सिटी जर्नल'च्या सन १९४१ च्या अंकांत 'हेमाद्रीचा निधनकाल' या शीर्षकाखालीं डॉ. कोलते यांनीं एक टिप्पण लिहिलें आहे, त्यांत त्यांनीं खालील माहिती दिली आहे :

"महानुभावपंथ-संस्थापक श्रीचक्रधर याचा जीवन चरित्रविषयक 'लीळा चरित्र' नामक ग्रंथ इ. स. १२७६ ते १२८६ या काळांत केव्हां तरी लिहिला गेला. याच्या जाखोबा पाठांत हेमाद्रीचा अंत हृदयद्रावक रीतीनें कसा व केव्हां झाला याविषयीं माहिती मिळते. श्रीचक्रधर हा द्वैतमार्गाचा उपदेश करी. विद्वान् लोकांमध्यें त्याच्या पंथाचा पुष्कळ प्रसार होऊं लागला. त्यामुळें शंकराचार्यांच्या अद्वैतमार्गावरून लोकांचें लक्ष उडालें. तेव्हां यादवांचा उपाध्याय ब्रह्मसानु व हेमाद्रीचा उपाध्याय महदाश्रम यांना त्याचें वैषम्य वाटून त्यांनीं चक्रधराला विषप्रयोग करण्याचा प्रयत्न केला; पण तो फसला म्हणून महदाश्रम यानें आपला शिष्य हेमाद्रि यास चक्रधराचा कसेंही करून नाश करण्याचा आदेश दिला. तेव्हां हेमाद्रीनें चक्रधरावर कांहीं सैन्य पाठविलें; पण चक्रधर व त्याचा शिष्य नागदेव यांनीं त्याचा मोड केला. नंतर हेमाद्रीला पश्चात्ताप होऊन त्यानें चक्रधराला देवगिरीस बोलाविलें. तिकडे जात असतां वाटेंत खोकर गावीं मेघगर्जना व विजाचा कडकडाट होऊन चक्रधर त्यांत अदृश्य झाला.

"वरील वृत्तांतांत चक्रधर अदृश्य झाला असें म्हटलें आहे, पण खरोखरी त्याचा खून झाला होता. व तसें कांहीं पोथ्यांत म्हटलेंही आहे. महानुभावपंथसंस्थापक व ईश्वरी अवतार म्हणून अनेकांस पूज्य वाटणाऱ्या चक्रधराचा असा दगलबाजीनें खून झाल्याचें ऐकतांच रामदेवरावाचा क्रोध अनावर होऊन त्यानें हेमाद्रीची सर्व मालमत्ता जप्त केली, त्याच्या घरावर नांगर फिरविला व त्याला लागलीच देहांताची शिक्षा दिली. हेमाद्रीचा अत्यंत क्रूरपणें अंत करण्यांत आला. त्याच्या अंगाचें कातडें सोलून व उपाशीं ठेवून त्याला हालहाल करून ठार मारण्यांत आलें.









अनुक्रमणिका

# हेमाद्रीचा अंतकाल

" महानुभाव ग्रंथात दिलेल्या हेमाद्रीच्या हृदयद्रावक अंताच्या या वृत्तांतास महिकावतीच्या बखरींत दुजोरा मिळतो. या बखरींत म्हटलें आहे कीं, 'रामचंद्र राजा राज्य करीत असतां ब्रह्महत्येच्या दूषणानें मोठें अशुभ झालें. त्यायोगें त्याचा शक्तिक्षय होऊन तुर्कांनीं त्याचा पाडाव केला ' (महिकावतीची बखर, पृ. ८१). बखरींतील या वृत्तांतांतील रामदेवरावानें कोणा ब्राह्मणास मारलें याचा निर्देश नाहीं. तथापि महानुभावीय ग्रंथांतील वर्णनावरून तो हेमाद्रीच होता याविषयीं संशय राहत नाहीं. चक्रधराचा खून झाल्यावर हेमाद्रीस लवकरच ठार मारण्यांत आलें असावें. चक्रधराचा खून शके ११९८ किंवा इ. स. १२७६ मध्यें झाला. तेव्हां हेमाद्रीचा निधनकाल यानंतर लौकरच असला पाहिजे."

डॉ. कोलते यांनीं प्रस्तुत मत प्रतिपादिल्याला आज आठ वर्षें झालीं. या अवधींत त्यावर कोणी आक्षेप घेतलेला माझ्या वाचनांत आला नाहीं. अलीकडे 'नवभारतां'तील (ऑगस्ट १९४८) लेखांत त्यांनीं हेंच मत पुनः प्रतिपादिलें आहे. सत्यान्वेषणार्थ त्याचा थोडया बारकाईनें विचार करूं.

## डॉ. कोलते यांचा पुरावा डळमळीत

श्री. ह. ना. नेने यांनीं 'लीळाचरित्र' हा ग्रंथ मोठ्या परिश्रमानें संपूर्ण प्रकाशित केला आहे. त्यामध्यें हेमाद्रीच्या वरील कारवाईचा निर्देश नाहीं. त्यामुळें या वृत्तांताविषयीं संशय उत्पन्न होतो. लीळाचरित्राच्या उत्तरार्धांतील (पृ. २७७) ५०३ या लीळेंत 'चक्रधरानें आपणांस राजाचें बोलावणें येईल व तेथें गेल्यावर आपणांस लोटून देतील' असें सांगितल्याचा उल्लेख आहे. पुढील लीळेंत चक्रधर राजाकडे गेल्यावर त्याच्या बरोबरच्या भटाबासांवर लाठीहल्ला झाल्याचें वर्णन आहे. पण चक्रधर त्या दंगलींत प्राणास मुकल्याचें सांगितलें नाहीं. इतकेंच नव्हे तर तो उत्तरदिशेस निघून गेला, जातांना विंध्यपर्वत ओलांडीत असतां त्याची व गोदातीरनिवासी च्याटे लोकांची भेट झाली; त्यानें त्यांस आपल्या शिष्यांस सांगण्याकरितां संदेश दिला इत्यादि वर्णन आहे. पुढें चक्रधर उज्जैनीस गेला असेंहि म्हटलें आहे. या सर्व वर्णनावरून चक्रधर त्या दंगलींतून वांचून उत्तरहिंदुस्थानांत निघून गेला असें दिसतें. श्री. नेने सांगतात कीं, आपण लीळाचरित्राच्या अनेक प्रती पाहिल्या, पण त्यांमध्यें कोठेंहि जाखोबा पाठांतल्यासारखें वर्णन आढळलें नाहीं. विशेष लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं लीळाचरित्राच्या प्रचलित पाठांत चक्रधराला बोलाविलें तें राजानें, असें स्पष्ट म्हटलें आहे. या सर्व प्रकरणांत कोठेंही हेमाद्रीचा नामनिर्देश नाहीं, त्याला जिवंत सोलल्याचें वर्णन तर नाहींच नाहीं !

महिकावतीच्या बखरींत ब्रम्हहत्येमुळें रामचंद्राच्या राज्याचा नाश झाला असें म्हटलें आहे खरें. पण तीमध्यें ज्याची हत्या झाली तो ब्राह्मण हेमाद्रि होता असें सांगितलें नाहीं. शिवाय त्या बखरींतील वर्णन ऐतिहासिक कसोटीस उतरत नाहीं. या बखरीचीं सहा प्रकरणें असून तीं भिन्न भिन्न काळीं रचलीं गेलीं असें कै. राजवाड्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. देवगिरीच्या युद्धाचें वर्णन भगवान् दत्तानें केलें असें तींत म्हटलें आहे. पण ती हकीकत सुमारें शके १५०० नंतर लिहिली असावी, असें कै. राजवाड्यांचें अनुमान आहे. अर्थात् हें वर्णन यादवकाळापासून सुमारें तीनशें वर्षांनंतर लिहिलें होतें. इतक्या दीर्घावधीनंतर यादवकालीन घटना यथातथ्य लोकांच्या स्मरणांत राहिल्या असतील हें संभवनीय वाटत नाहीं. या बखरींतला यादव वंशाचा इतिहास तत्कालीन कोरीव लेखांतील माहितीशीं अगदींच जुळत नसल्यामुळें सर्वस्वीं त्याज्य होय हेंही कै. राजवाड्यांनीच दाखविलें आहे. 'भगवान् दत्ताला व पांचव्या प्रकरणाच्या कर्त्याला रामदेवरावाच्या म्हणून ज्या वंशावळी वाटल्या त्या त्या राजांच्या नाहींत. ह्या ठिकाणीं भगवान् दत्त व पांचव्या प्रकरणाचा कर्ता हे सपशेल घसरले' असें कै. राजवाडे यांनीं स्पष्ट म्हटलें आहे (प्रस्तावना, पृ. ७४). राजवंशावलीसारख्या महत्त्वाच्या बाबींत जी बखर इतकी अविश्वसनीय, तिच्यांतील इतर विधानांवर विश्वास कसा ठेवावयाचा !

येथवर हेमाद्रीच्या हृदयद्रावक अंताविषयीं ज्या पुराव्यावर डॉ. कोलते यांनीं भिस्त ठेवली तो कसा





अनुक्रमणिका

डळमळीत आहे तें दाखविलें. पण याहीपुढें जाऊन हेमाद्रीला शके ११९८ (सन १२७६) मध्यें हृदयद्रावक पद्धतीनें राहोच, पण कोणत्याहि रीतीनें मृत्यु प्राप्त झाला नव्हता, एवढेंच नव्हे तर तो त्यापुढें कित्येक वर्षे रामदेवरावाचा करणाधिप म्हणून अधिकारी होता हें एका निर्विवाद पुराव्यावरून सिद्ध करतां येतें. त्याकडे आतां वळूं.

## चक्रधरामागून हेमाद्रि नऊ वर्षे तरी होता

चक्रधराच्या उत्तरापथीं निर्याणाच्या मितीबद्दल महानुभावांच्या ग्रंथामध्यें एकवाक्यता नाहीं. तथापि त्यांतल्या त्यांत तीर्थमालिकेंत दिलेला शके ११९४ (इ. स. १२७३) अंगिरा संवत्सर, माघ वद्य ४ मंगळवार, हा विश्वसनीय दिसतो. कारण यांत शक-वर्षाचा, संवत्सराचा व तिथिवारांचा वेळ जमतो. पण लीळाचरित्र व रत्नमालास्तोत्र यांतील सिंहस्थाचा उल्लेख प्रमाण मानून व तेथपासून कालगणना करून चक्रधरानें शके ११९८ मध्यें उत्तरेकडे गमन केलें असें डॉ. कोलते यांनीं ठरविलें आहे. यापैकीं कोणताहि काल खरा म्हणून स्वीकारला तरी चक्रधराच्या खुनामुळें किंवा खुनाचा प्रयत्न केल्यामुळें हेमाद्रीला निर्दयपणानें ठार मारण्यांत आलें असल्यास ती घटना शके ११९८ मध्यें किंवा शके ११९९ या वर्षी तरी झाली असली पाहिजे. त्यानंतर कित्येक वर्षे स्वस्थ बसून मग राजानें हेमाद्रीला अशी घोर शिक्षा दिली असणें संभवनीय वाटत नाहीं.

हेमाद्रि हा राजदरबारीं करणाधिप किंवा मंत्री म्हणून महत्त्वाच्या हुद्द्यावर होता. म्हणून तत्कालीन कोरीव लेखांत इतर मंत्र्यांप्रमाणें त्याचेंहि नांव येतें. अशा प्रकारचे उल्लेख एका ताम्रपटांत व दोन शिलालेखांत आलेले आम्हांस माहीत आहेत. यापैकीं पहिला उल्लेख ठाणें जिल्ह्यांत ओवळें येथें सांपडलेल्या रामदेवरावाच्या शके ११९४ च्या ताम्रपटांत आहे. या ताम्रपटांत हेमाद्रीला सर्व हस्तिपकांचा अध्यक्ष, समस्तकरणाधिप व मंत्रिचूडामणि असें म्हटलें आहे. त्यावरून राजदरबारच्या त्याच्या महत्त्वाची कल्पना येते; तथापि चक्रधराचा खून किंवा निर्याण ११९८ मध्यें झालें असल्यास या उल्लेखाचा काहीं उपयोग नाहीं. यानंतरचा हेमाद्रीचा निर्देश सासवड-(जिल्हा पुणें)-जवळच्या पूर गांवीं सांपडलेल्या शिलालेखांत आहे. हा शिलालेख भारत-इतिहास-संशोधक-मंडळांत ठेवला आहे. तो मंडळांतील पुरातत्त्वज्ञ श्री. ग. ह. खरे यांनीं 'दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें', खंड दुसरा (पृ. ६–८) यामध्यें प्रकाशित केला आहे. या लेखाची मिति आरंभींच 'स्री सकू १२०७ वर्षे प(पा)र्थिव संवच्छेरे आस्विन(ना)दौ' अशी दिली आहे. पुढें श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ती श्रीरामचंद्रदेवाच्या विजयराज्यांत तत्पादपद्मोपजीवी सकलकरणाधिप हेमाद्रिपंडित व इतर अधिकारी असतांना कांहीं इनाम दिल्याचा उल्लेख होता. पण पुढील भाग खंडित झाला आहे. तथापि यांतील हेमाद्रीचा निर्देश महत्त्वाचा आहे. श्री. खरे यांनीं हा लेख वाचला असल्यामुळें लेखाचा छाप प्रसिद्ध केला नसला तरी त्यांचें वाचन बरोबर आहे, असें गृहीत धरण्यास हरकत नाहीं. शिवाय शके १२०७ ला पार्थिव हाच संवत्सर येत असल्यानें लेखाच्या सत्यतेविषयीं संशय रहात नाहीं. कोणास संशय आल्यास इतिहासमंडळांत तो लेख समक्ष पाहून खात्री करून घेता येईल.

या लेखावरून शके १२०७ ते सन १२८५ पर्यंत म्हणजे चक्रधरनिर्याणानंतर निदान नऊ वर्षे हेमाद्रि आपल्या महत्त्वाच्या अधिकारावर होता असें स्पष्ट दिसतें. तेव्हां त्याच्या हृदयद्रावक अंताची कथा कल्पित असली पाहिजे; व ती इ. स. १२७६ ते १२८६ या काळांत लिहिलेल्या 'लीळाचरित्रां'त येणें शक्य नाहीं, हें उघड आहे.

याच्याहीनंतरचा शके १२११ चा लेख निजामच्या संस्थानांत उनकेश्वर येथें आहे. तो डॉ. य. खु. देशपांडे यांनीं भारत-इतिहास-संशोधकमंडळाच्या त्रैमासिकांत (पु. ९ वें, पृ. २९-३०) प्रसिद्ध केला यांतही हेमाद्रिपंडिताचें रामदेवरावाचा मंत्री म्हणून नांव आलें आहे. हा लेख डॉ. देशपांडे यांच्या वाचनाप्रमाणें शके १२११ विक्रमसंवत्सरांतील आहे. पण शके १२११ ला संवत्सरचक्रांतील विक्रम हें संवत्सर येत नाहीं. विक्रम याच्या जागीं विकृत असें वाचणें शक्य असल्यास १२११ हा गतवर्षनिर्देश





अनुक्रमणिका

समजून त्याशीं विकृत-संवत्सराचा संबंध जोडतां येईल. कारण शके १२१२ ला विकृतसंवत्सर होतें. पण या लेखाचा छाप प्रसिद्ध न झाल्यानें या बाबतींत निश्चित विधान करणें शक्य नाहीं.

शके १२१२ चा रामदेवराव यादवाचा ठाणा (अष्जुर) येथें सांपडलेला दुसरा एक ताम्रपट प्रसिद्ध झाला आहे. त्यांत मात्र हेमाद्रीचें नांव येत नाहीं. मागें ११९४ च्या ताम्रपटांत व महाराष्ट्रांतील रामदेवरावाच्या कांहीं शिलालेखांत हेमाद्रीचें नांव येत असल्यानें याही लेखांत तें यावें अशी सहजच अपेक्षा होते. या ताम्रपटांत महामात्य एकदेवपंडित व कोशाधिपति चांगदेव यांचीं नांवें आलीं आहेत; पण हेमाद्रीचें नाहीं. त्यावरून हेमाद्रि शके १२१२ मध्यें किंवा (उनकेश्वराच्या लेखाचें वरील वाचन खरें असल्यास) त्यापूर्वीं थोडेच दिवस दिवंगत झाला असावा.

## हेमाद्रीच्या अंताविषयींची कथा बनावट

वरील विवेचनावरून हेमाद्रीनें महानुभावपंथ-संस्थापक चक्रधर यांस ठार मारलें व त्यामुळें त्याचा राजाज्ञेनें हृदयद्रावक रीतीनें अंत करण्यांत आला या आख्यायिकेला काडीचाही आधार नाहीं. किंबहुना ती सर्वस्वीं खोटी आहे याविषयीं वाचकांचीं खात्री होईल. आपल्या धर्माविरुद्ध असलेल्या माणसांचा अशा रीतीनें शेवट झाला हें सांगण्याची प्रवृत्ति सर्वत्र आढळते. उदाहरणार्थ, इ. सनाच्या सातव्या शतकांत बंगालच्या शशांकनामक राजानें गयेच्या बोधिवृक्षाचीं पाळेंमुळें खणून काढलीं व त्यामुळें त्याला अतिशय दुर्धर असा रोग होऊन त्यांत त्यांचा अंत झाला अशी किंवदन्ती चिनी यात्रेकरू ह्यूएनत्संग यानें लिहून ठेविली आहे ती ही या प्रकारचीच आहे. हेमाद्रीच्या हृदयद्रावक अंताविषयींची आख्यायिका सुद्धां अशींच बनावट असावी.

महानुभावपंथ वैदिक धर्माला कांहीं बाबतींत विरोधी असल्यानें तत्पंथीयांचा यादवांच्या राजवटींत छळ झाला असणें अगदीं संभवनीय आहे. फार प्राचीन काळापासून चारी वर्णांना श्रुतिस्मृतिविहित कर्मे करावयास लावून वर्णसंकर होऊं न देणें राजाचें प्रमुख कर्तव्य गणलें जात असे. वर्णसंकर होणें अनिष्ट आहे, हें केवळ ब्राह्मणाचेंच नव्हे, तर सर्वसाधारण जनतेचें मत होतें व तें अनेक पिढ्यांपासून चालत आलेलें म्हणून लोकांच्या हाडींमासीं भिनलें होतें. महानुभावांचे कांहीं आचारविचार या परंपरागत धर्माविरुद्ध असल्यानें तत्कालीन राजे किंवा त्यांचे अधिकारी यांचेकडून त्यांचा छळ झाला असला तर त्यांत आश्चर्य नाहीं. पण या छळाला हेमाद्रिच कारण होता व त्याच्या निधनानंतर तो थांबला असें दिसत नाहीं. कांहीं वर्षांपूर्वीं निजामच्या राज्यांतील बीड जिल्ह्यांत गोदाकांठीं पुरुषोत्तमपुरी येथें सांपडलेला ताम्रपट आम्हीं 'एपिग्राफिया इंडिकां'त प्रसिद्ध केला आहे. हा ताम्रपट शके १२३२ (इ. स. १३१०) चा म्हणजे रामदेवरावाच्या कारकीर्दीच्या अगदीं अखेरीचा आहे. त्यांत रामदेवरावाचा मंत्री पुरुषोत्तम याच्या विनंतीवरून रामदेवरावानें गोदावरीच्या कांठीं एक अग्रहार करून तो ८३ ब्राह्मणांस दिल्याचा निर्देश आहे. या पुरुषोत्तम-मंत्र्याचें वर्णन करतांना खालील श्लोक घातले आहेत—

स विद्युतेवोज्ज्वलया निजाज्ञया
प्रदर्श्य वर्णाश्रमयोः पृथक्क्रमान् ।
महीपतेः कोशगृहे महीयसीं
सुवर्णवृष्टिं व्यतनोद् घनोपमः ॥

स्वामिद्रोहकृतामयोवलयवद्वक्रं कठोरं मनस्तस्य प्रज्वलता प्रतापशिखिना नीतं जवादार्जवम् ।
क्रूरास्तेषु सकटंकद्रुमनिभाः प्लुष्टा निकृष्टास्ततो रामक्षोणिपतेः सुवर्णसदृशं तेजः कृतं प्रोज्ज्वलम् ।

[भावार्थ—जसा एखादा मेघ झगझगीत अशा वीजेनें मार्ग निरनिराळे दाखवून मोठी वृष्टि करतो, तसाच तो पुरुषोत्तममंत्री आपल्या उज्ज्वल आज्ञेनें वर्ण व आश्रम यांचे आचारमार्ग पृथक् दाखवून राजाच्या कोठीमध्यें सुवर्णाची मोठी वृष्टि करता झाला.

राजद्रोह करणाऱ्या लोकांचें लोखंडासारखें कठोर व वक्र असें मन त्याच्या अग्नीप्रमाणें ज्वलज्जहाल अशा पराक्रमानें लागलीच सरळ केलें. त्याच्या त्या

प्रतापाग्नींत क्रूर लोक कांटेरी झाडासारखे जळून बाहेर आले व त्यायोगें रामभूपतिंचें तेज सुवर्णासारखें उज्ज्वल झालें. ]

वरील श्लोकांपैकीं पाहिल्यांत पुरुषोत्तम-मंत्र्याची धार्मिक बाबतींतील व दुसऱ्यांत राजकीय क्षेत्रांतील कामगिरी वर्णिली आहे. रामदेवराव यादवाच्या काळीं महानुभावासारखे वैदिक मार्गविरोधी पंथ होते. त्याप्रमाणें राजाचे विरोधी असेहि कांहीं लोक होते. या दोघांनाही पुरुषोत्तम-मंत्र्यानें आपल्या कडक धोरणानें आपल्या काबूंत आणलें असें दिसतें. यांत एखाद्या विशिष्ट पाखंडाचा निर्देश नाहीं हें खरें. तथापि त्यावरून हेमाद्रीच्या मृत्यूनंतरहि यादवांच्या शासनपद्धतींत कांहीं फरक पडला होता असें दिसत नाहीं. तेव्हां त्या पद्धतीला हेमाद्रीच जबाबदार होता असें मानणें योग्य होणार नाहीं.

---

## " अणोरणीयान् महतो महीयान् "

**श्रीअरविंदा**विषयीं गुजराथी त्रैमासिक "मानसी"मध्यें बरीच माहिती प्रसिद्ध होते. "मानसी"च्या जूनच्या अंकांतून **श्रीअरविंद**कृत पुढील कविता ( इंग्रजी ) घेतली आहे.

### THE INFINITESIMAL INFINTE

Out of a still immensity we come.
These million universes were to it
The poor light-bubbles of a trivial game
A fragile glimmer in the Infinite.

It could not find its soul in all that Vást;
It drew itself into a little speck
Infinitesimal, ignobly cast
Out of earth's mud and slime strangely awake,—

A tiny plasm upon a casual globe
In the small system of a dwarf-like sun,
A little life wearing the flesh for robe,
A little mind winged through wide space to run,

It lived, it knew, it saw its self sublime,
Deathless, outmeasuring space, outlasting time.

" निःशब्द असा जो 'भूमा' त्यामधून आपण निर्माण झालेले आहोंत. —त्याला हीं लक्षावधीं विश्वें म्हणजे एका क्षुद्र क्रीडेंतील बापुडे प्रकाश–बुडबुडे होत ! त्या अनंतांतील तीं एक क्षणभंगुर मिणमिणती चमक होय.

त्याला त्या विशालतेंत आपला आत्मा आढळला नाहीं; तेव्हां त्यानें स्वतःला एका अणूहून चिमुकल्या अशा किरणांत प्रविष्ट केलें. —वसुंधरेच्या कर्दमांतून आणि खालच्या गाळांतून तिरस्कारानें फेंकलेला तो परम अणु जाग्रत होता हें किती नवलाचें !

'कोण्या वामनमूर्ति सूर्याच्या मालिकेंतील एका सहजीं उद्भवलेल्या गोलावर तो एक सूक्ष्म जीवपेशी बनला; मांसशरीराचें वस्त्र धारण करणारा जीव, आणि विशाल स्थलसीमेंतून संचार करणारें मन तो बनला. तो जगला, त्याला ज्ञान प्राप्त झालें. त्याला आपलें दिव्य रूप दिसलें. अमर असें तें रूप स्थलसीमेहून विशाल व कालसीमेहून चिरंतन, दिक्कालानवच्छिन्न होतें." —अनु.–श्री. **ना. ग. जोशी**

प्रा. म. अ. मेहेंदळे

# 'हिंदी जनता झिंदाबाद'

[ स्वतंत्र हिंदुस्थानची घटना तयार होऊन त्या घटनेप्रमाणें सनदशीर आणि लोकशाही सरकार देशांत प्रस्थापित व्हायचें आहे. त्यासाठीं देशभर निवडणुकीची मोहीम जोरांत चालू आहे आणि सारा देश उत्साहानें व कुतूहलानें पुलकित झाला आहे. ह्या निवडणुकींत पक्ष एकमेकांसमोर दंड थोपटून उभे आहेत. आतां निवडणूक-युद्धांतलि पहिला बाण सुटणार इतक्यांत त्या युद्धांत लढण्यांस सज्ज झालेला समाजवादी प्रवृत्तीचा तरुण पुढारी आपल्या पांढऱ्या शुभ्र घोड्यांच्या रथांत बसून तेथें आला आणि मग त्याच्यांत व त्याच्या जनताजनार्दनरूप सारथ्यांत खालील संवाद घडला. ]

**तरुण :** जनार्दना, ह्या निवडणुकीच्या युद्धांत प्रतिपक्ष्यांशीं लढण्यास माझ्या हातांतलि ही लेखणी पहा कशी फुरफुरत आहे. आतां पत्रकांवर पत्रकें काढून समोरच्या पक्षाचा कसा धुव्वा उडवतो पहा! पण तसें करण्यापूर्वी माझा रथ जरा दोन्ही पक्षांच्या मधोमध घेऊन जा म्हणजे मला कोणकोणत्या प्रतिपक्षीयांशीं लढावयाचें आहे तें कळेल.

**जनार्दन :** आयुष्मन्, तुझा उत्साह पाहून मला अत्यंत आनंद होत आहे. युद्धांत तुझा विजय असो. तुझ्यासारख्या तरुण पुरुषावरच साऱ्या जनतेचें लक्ष लागून राहिलें आहे. तुझे प्रतिपक्षी कोण कोण आहेत ते तुला ठाउक का नाहीं? पण तुला पुन्हां एकदां त्यांच्याकडे दृष्टिक्षेप करण्याची इच्छाच असेल तर हा पहा रथ मी तिकडे घेऊन जातों. (थोड्या वेळानें) हा पहा आपला रथ समोरील योद्ध्यां समोर आला. ही निवडणूक जिंकण्यासाठीं तुला कोणकोणत्या पक्षांशीं व व्यक्तींशी दोन हात करायचे तें पाहून घे.

[ जनार्दनाचे हे बोल ऐकून विजयी मुद्रेनें तो तरुण समोर उभ्या टाकलेल्या रथी-महारथींच्याकडे पाहूं लागला. त्याला त्याचे प्रतिपक्षी जरी ठाऊक होते तरी आतां त्या सर्वांना एकत्र समोर उभे राहिलेले पाहून त्याचें मन व्याकुल होऊं लागलें. आपल्याच देशबांधवांशीं दोन हात करून त्यांना नेस्तनाबूद करण्याची वेळ येऊन ठेपतांच त्याचें मन कच खाऊं लागलें. त्याच्या मनांत शंका-कुशंका डोकावूं लागल्या व विषादानें त्याचें सारें चित्त ग्रासून टाकलें. अशा मनःस्थितींत तो आपल्या सारथ्याला पुन्हां म्हणाला : ]

**तरुण :** जनार्दना, माझ्याशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें जमलेल्या ह्या बांधवांकडे पाहून माझी फार चमत्कारिक परिस्थिति होत आहे. माझे हातपाय कांपूं लागले आहेत आणि ही लेखणी हातांतून गळून पडत आहे. माझें मन अतिशय अस्थिर झालें आहे. अरे, ह्या इथें जमलेल्या लोकांत त्यांचाच प्रामुख्यानें भरणा आहे कीं ज्यांच्या खांद्याला खांदा लावून मी आजवर जगलों, वाढलों, व लोकहिताचें काम केलें. कालपर्यंत जे माझे बंधू होते, ते आज एकदम शत्रू झाले! त्यांच्याविरुद्ध मी तोंडांतून शब्द कसे काढूं कीं ह्या लेखणीनें ते कसे लिहूं? आपल्याच बांधवांविरुद्ध लढण्यांत मला कोणतेंच हित दिसत नाहीं. मला ह्या निवडणुकींत जयहि नको कीं त्यापासून मिळणारी राज्यसत्ताहि नको! ह्या धुमश्चक्रींत माझा पुरा धुव्वा उडाला तरी चालेल; पण मी ह्या माझ्याच बांधवांशीं मुळींच लढूं इच्छीत नाहीं. आपापसांतच आम्ही असें झगडल्यावर आमच्या

वर प्रेम तरी कोण करणार ? उलट, आततायी असले तरी आपल्याच लोकांविरुद्ध गेल्यामुळें मला पाप लागेल. ह्या निवडणुकीचा झगडा झगडण्यांत माझे प्रतिपक्षी मित्रद्रोह करीत आहेत. आज ते ज्या मार्गानें जाऊं इच्छीत आहेत त्यामुळें साऱ्या देशाचा ऱ्हास होणार आहे. आपला देश ज्या एका नैतिक सामर्थ्यासाठीं गाजला आहे तो त्याचा सनातन धर्म लोप पावणार आहे. माझ्या ह्या बांधवांना सत्तेचा लोभ कांहीं एक सुचूं देत नसल्यामुळें त्यांना ह्या दोषांपैकीं कांहीं एक दिसत नाहीं. तथापि ह्या लोकां-विरुद्ध जाण्यांत आमच्यांकडून जें पाप होत आहे तें डोळ्यांनीं नीट दिसत असूनसुद्धां आम्हीं त्यापासून परावृत्त व्हावें कीं नाहीं ? राज्यलोभामुळें स्वजनांशीं युद्ध करण्यास आम्हीं उद्युक्त झालों होतों म्हणजे आमच्या हातून तें एक मोठें पापच घडत होतें !

[ एवढें बोलल्यावर त्या समाजवादी प्रवृत्तीच्या तरुणानें हातांतून लेखणी खालीं ठेवली व विषण्ण मनानें तो खालीं बसला. त्याची ती अवस्था पाहून त्याला हुरूप आणण्यासाठीं आणि त्याच्या मनाला झालेला मोह घालविण्यासाठीं जनार्दन म्हणाला : ]

**जनार्दन :** हे वीरपुरुषा, अशा आणीबाणीच्या प्रसंगीं तुला ही काय अवदशा आठवली ? तुझें हें वागणें जनसेवेच्या तुझ्या ब्रीदाला शोभत नाहीं. अशानें साऱ्या देशांत तुझी छीः थू होईल. एखाद्या निःसत्त्व माणसासारखें हें वागणें तुला मुळींच शोभत नाहीं. तेव्हां ही क्षुद्र मनोभावना टाकून देऊन शत्रूच्या हृदयाचा थरकांप उडवणारी ही तुझी लेखणी पुन्हां उचल.

**तरुण :** जनार्दना, तूं म्हणतोस त्यांत थोडेसें तथ्य आहे. म्हणजे मला युद्धाचें भय वाटतें अशांतला भाग नाहीं; पण माझ्या नांवाला मीं निवडणुकींतून माघार घेतल्यास अपकीर्तीचा कलंक लागेल हें खरें. पण तो सहन करूनहि कालपर्यंत मला गुरूप्रमाणें पूज्य वाटणाऱ्या श्रेष्ठींशीं मीं मतभेदामुळें दोन हात करावे हें मला उचित वाटत नाहीं. ज्यांची वास्तविक आज हिंदी तरुणांनीं स्तुतिस्तोत्रें गावींत, त्यांच्या वर्तनाचा आणि हेतूंचा संशय घेऊन त्यांच्यावर टीकेचे कठोर प्रहार करावे हें मनाला कसेसेंच वाटतें! ह्यांना सत्तेचा आणि कांहींना पैशाचा लोभ झाला असला तरी ते सर्व माझ्याहून वडील आहेत ! तेव्हां त्यांना नामोहरम करून सत्ता हातीं घेण्यापेक्षां सरळ राजकारणातून अंग काढून घेऊन एकाद्या आश्रमांत जाऊन रचनात्मक कार्य करीत राहणें बरें, असें आतां माझ्या मनानें घेतलें आहे. शिवाय कालपर्यंत आम्हांला ज्यांच्या नेतृत्वाखालीं काम करण्यास हरकत वाटत नव्हती ते लगेच आज आम्हांला शत्रुवत् कां वाटावेत असेंहि मला कोडें वाटूं लागलें आहे.

**जनार्दन :** हे तरुणा, मनाला संभ्रमांत टाकील अशी ही गोष्ट आहे खरी. पण केवळ ह्या गोष्टी-खेरीज इतरहि कांहीं शंका तुझ्या मनांत वास करून राहिल्यासारख्या दिसतात. कालचे मित्र आज शत्रू कसे होऊं शकतात असें तूं विचारतोस; पण कालच्या तुझ्या मित्रांनीं आपली निष्ठा सोडली असें जर तुला वाटत असेल आणि जर त्यांचा मार्ग गैर असल्याची तुझी खात्री असेल तर, हे शूर पुरुषा, ते तुझ्यापेक्षां वयानें वडील असलें तरी त्यांच्याशी तुला दोन हात केलेच पाहिजेत. आजच्या श्रेष्ठींचे मित्र कोणकोणते आहेत तें तपासून पाहा म्हणजे तुला पुष्कळशा गोष्टींचा उलगडा होईल. तो पहा अमेरिकेचा ध्वज फडकत असलेला प्रेसिडेंट ट्रूमनचा रथ. आपल्या राष्ट्रांतील अजस्र भांडवलदारांचे हितसंबंध सुरक्षित राहावेत म्हणून या युद्धांत तुझ्या प्रतिपक्षीयांना तो येऊन मिळाला आहे. जोंपर्यंत आपल्याला ब्रिटिशांशीं सामना द्यायचा होता तोंपर्यंत हे भारतीय श्रेष्ठी पुरोगामी होते आणि आम्हीं त्यांचा पाठपुरावा केला. पण आज सर्व पारडें फिरलें आहे. ब्रिटिशांची येथील सद्दी संपताच आमचे हे पुढारी, गरीबांचे नव्हेत, तर श्रीमंतांचे खरे कैवारी असल्याचें दृश्य सर्व बाजूस दिसत आहे. त्यामुळेंच हे कालचे तुझे मित्र आज शत्रू ठरत आहेत. भारतीय तरुणा, हें सर्व कशाचें द्योतक आहे हें मीं आणखी स्पष्ट करायलाच हवें कां ?

**तरुण :** जनार्दना, तूं म्हणतोस तेवढ्यानें माझ्या मनाचें समाधान होत नाहीं. हे माझे शत्रू ठरत असले तरी ह्यांच्याशीं लढून जिंकण्यांत कीं मुळींच न लढण्यांत आमचें खरें श्रेय आहे हें मला

कळत नाहीं. मला केवळ राज्यसत्तेचा मोह मुळींच वाटत नाहीं; इतकेंच नव्हे तर ह्या श्रेष्ठींना पराभूत करून त्यांच्याशिवाय राज्यशकट चालवणें योग्यहि वाटणार नाहीं. हे जनतारूप महापुरुषा, मीं तुला शरण आलों आहे. ज्यामुळें माझें कल्याण होईल असा निश्चित मार्ग मला दाखव.

**जनार्दन :** ( किंचित् हंसून ) तूं माझ्याजवळ उपदेशाची याचना करतोस. पण तसें करतांना आव तर मोठ्या पंडिताचा आणला आहेस. तुला मुख्य भीति वाटते ती म्हणजे वडिलधाऱ्या आणि काल पर्यंत मित्रवत् वाटणाऱ्या शत्रूंना नामोहरम करण्याची. पण हे शूरा, तूं जर खरा पंडित असशील, ज्या सत्य मार्गानें चालण्याचा तुझा निश्चय आहे त्यावरील निष्ठा जर कायम असेल तर असला फुकटचा शोक तूं करीत बसणार नाहींस. तूं तुझ्या शत्रूंचा नाश करणार म्हणजे फक्त त्यांनीं सध्यां लोकांची उपेक्षा करण्याचें जें बाह्य आवरण घेतलें आहे, त्याचाच तूं नाश करणार. त्यांच्यांत जें कांहीं तुझ्याहि मार्गाला पोषक असें चिरंतन सत्य आहे तें तर अविनाशी आहे. त्याचा नाश तूं करूं म्हणशील तरी तें शक्य नाहीं. गरीबांना छळण्याचें, त्यांच्या कष्टावर आपली श्रीमंती चैन चालवण्याचें, व धर्माचें अवडंबर माजवून त्यांना त्यांच्या उपासमारींतच कल्याणाचा मार्ग उपदेशिण्याचे जे हे भांडवलशाही चाळे आहेत ते सर्व केव्हांना केव्हां तरी नाश पावणारच आहेत. तूं त्यांचा नाश केला नाहींस तर ते अमर होतील असें मुळींच समजूं नकोस. त्यांचा धर्मच नाश पावण्याचा आहे; तर त्याउलट साऱ्या मानवसमूहाचा ऐहिक अभ्युदय ( केवळ परमार्थिक निःश्रेयसच नव्हे ) करणारें जें सत्तत्त्व आहे तेवढेंच चिरंतन आणि कधींहि नाश न पावणारें आहे. हे तरुण पुरुषा, तुला हा नसता अहंकार कां वाटूं लागला हेंच मला कळत नाहीं. ह्या सर्व तुझ्या प्रतिपक्षीयांना म्हणजेच त्यांनीं उराशीं कवटाळलेल्या प्रतिगामी तत्त्वांना, मीं ह्यापूर्वीच मारलेलें आहे. तूं फक्त त्यांना मारतांना त्या जनता–जनार्दनाच्या हातांतील एक निमित्त होणार आहेस !

**तरुण :** जनार्दना, तुझ्या ह्या उपदेशामुळें माझें मन कांहींसें शांत झालें आहे. पण एकदां मला तूं सत्याचा शोध घ्यायला सांगतोस आणि पुन्हां त्या निवडणुकीच्या फडांत अहमहमिकेनें भाग घ्यायला सांगतोस ! ह्या दोन गोष्टींची संगति कशी घालणार ? निवडणूक लढवून राज्यसत्ता हातीं घेण्यापेक्षां खरोखर जर तुझ्या मतें सत्यशोधनच अधिक श्रेष्ठ असेल तर मला तसें स्पष्टपणें कां सांगत नाहींस ? म्हणजे मी हा सर्व उपद्व्याप सोडून देऊन एकाद्या आश्रमांत जाऊन बसेन व जीवना-साठीं आवश्यक तेवढाच उद्योग रोज करून तत्त्व-चिंतनांत वेळ घालवीन. त्यामुळें माझेंहि कल्याण होईल व लोकांचेंहि कल्याण होईल. तत्त्वचिंतन व राजकारण ह्या दोन मार्गांपैकीं जो निश्चितपणें तुझ्या मतें श्रेष्ठ असेल तोच मला सांग. नसत्या संभ्रमांत मला टाकूं नकोस.

**जनार्दन :** हे हिंदी तरुणा, लोकसेवेचे आपल्याकडे हे दोन प्रचलित मार्ग आहेत खरे. कित्येकजण केवळ निवडणुका, अधिकाराच्या जागा यांवरच लक्ष ठेवून लोककल्याण साधूं पहातात तर इतर कांहीं जण ह्या गोष्टींकडे दुर्लक्ष करून निव्वळ सत्याचे प्रयोग करून लोकांना मार्गदर्शन घडवूं इच्छितात. ह्या दोन्ही मार्गांनीं जाणारे लोक निर-निराळ्या अर्थानें स्वतःचें हित साधत असतील.पण त्यामुळें खरा लोकसंग्रह होत नाहीं. त्यामुळें निव्वळ आश्रमीय जीवन जगून लोकसेवा साधण्याची तुझी इच्छा व्यर्थ होय. ह्यासाठीं उत्तम उपाय म्हणजे ह्या दोन्ही मार्गांचा समन्वय साधण्याचा. हे वीरपुरुषा, तूं म्हणजे समाजवादाचें प्रतीक आहेस. ह्या मार्गानें जाणारा लोकांना फसवून स्वतःची तुंबडी कधींच भरून घेत नाहीं. अशा रीतीनें काम करणें ह्यालाच फलनिरपेक्ष काम करणें असें म्हणतात. अशा रीतीनें फलाची आशा न ठेवतां जर तूं तुझें नित्यकर्म करीत राहिलास तर तुझ्या मनाला एक प्रकारचा समतोलपणा येईल. आणि पुढें येणाऱ्या कोठल्याही प्रश्नाचा सम-तोल बुद्धीनें विचार करूं लागल्यावर प्रत्येक बिकट प्रसंगीं तुला सत्यमार्ग आपोआपच दिसूं लागेल.

मीं जो तुला निवडणूक लढण्यास आणि सत्य-शोधन करण्यास एकदमच सांगतों तें ह्याच अर्थानें. कोठलीहि स्वार्थबुद्धि न ठेवता ही निवडणूक लढ आणि यश आल्यास तशाच निःस्वार्थ बुद्धीनें





अनुक्रमणिका

राजसत्ता हातीं घे. हे तरुण पुरुषा, खरा समाजवाद आणि खरी लोकसेवा ह्यांतच आहे. हा मार्ग जास्तींत जास्त यशस्वीपणें आचरणाऱ्या कर्म-योग्याचें उदाहरणच द्यायचें झालें तर महात्मा गांधींचें देतां येईल. त्यांनीं निव्वळ आश्रमीय जीवनांत कालव्यय कधींच केला नाहीं. आश्रमांत राहूनहि सत्यशोध करीत करीत त्यांनीं त्या त्या परिस्थितींत योग्य वाटलें तसें राजकारण लढविलें. त्यामुळें अलीकडच्या इतिहासांत भारतीयांची सेवा करण्याचा अनेकांनीं प्रयत्न केला तरी त्यांना त्यांत महात्माजींच्या इतकें यश आलें नाहीं.

ह्या उलट, हे देशसेवका, जर तूं तुझें कर्तव्य-कर्म सोडून देऊन निव्वळ ज्ञानोपासना करूं लाग-लास तर त्यामुळें इतर सामान्य लोकांचा तूं बुद्धिभेद करशील. तुझ्या वागण्याचे दुष्परिणाम एवढ्यानेंच थांबणार नाहींत. तूं आश्रमांत बसून सर्व कर्मांचा त्याग करण्याचा विचार करतो आहेस खरा, पण त्यामुळें सर्वत्र कुकर्म मात्र कसें माजेल, ह्याचा जरा सूक्ष्म आणि दूरदृष्टीनें विचार कर. आश्रमाचा परिवार जो वाढेल त्या सर्वांच्या चारितार्थासाठीं पैसा हा अवश्य लागणारच. ह्या संधीचा योग्य तोच फायदा तुझ्या नांवाचा उच्चार करून समाजांत प्रतिष्ठेचें व देशभक्तीचें स्थान मिळाविणारे भांडवल-दार घेतील. अशानें कळत न कळत तुझ्या हातून भांडवलशाहीला उत्तेजनच मिळत राहील. आणि ज्या समाजसत्तावादाचा आज तूं पुरस्कार करीत आहेत त्याचाच नेमका घात करण्याचें अपकृत्य तुझ्यामुळें घडेल. राजकारणाची व अर्थकारणाची सर्व सूत्रें अशांच्या हातीं गेल्यावर सामान्य जनतेची जी उघडीनागडी पिळणूक होत राहील तिला आळा कोण घालणार ? तेव्हां हे आशावादी तरुणा, प्रतिपक्षीयांना नुसतें पाहूनच आणि त्यांच्याशीं असलेलें तुझें नातें लक्षांत घेऊन निरुत्साही होऊं नकोस आणि कोणत्याहि स्वार्थाची हाव न धरतां हें युद्ध कर.

**तरुण :** जनार्दना, तुझ्या उपदेशानें माझा मोह जवळ जवळ सर्व मावळला आहे. मला माझ्या प्रतिपक्षीयांचें सत्यस्वरूप कळून आलें आहे व माझ्या न लढण्यानें जो अनर्थ गुदरेल त्याचेंहि चित्र माझ्या डोळ्यासमोर उभें राहिलें आहे. आतां फक्त माझ्या मनांत एकच शंका आहे. ती तूं दूर केलीस कीं, मी पुन्हां युद्धास प्रवृत्त होतों पहा. ती शंका अशी कीं, माणसानें आपल्या स्वतःच्या निःस्वार्थ बुद्धीवर कोठपर्यंत विश्वास ठेवावा ? तूं ज्या निरपेक्ष बुद्धीनें मला काम करायला सांगतोस तसली बुद्धि मिळविणें हें फार कठिण काम आहे. शिवाय हातीं सत्ता आल्यावर माणसाच्या मनाचें अधःपतन व्हावें अशीच सर्वत्र परिस्थिति असते. सर्वसाधारण माणसाचें मन कांहीं खंबीर नसतें. तेव्हां ज्याला फलनिरपेक्ष कर्मयोग एकदम शक्य नसेल अशानें काय करावें ?

**जनार्दन :** हे बुद्धिमान् पुरुषा, तुझी शंका अगदीं बरोबर आहे. माणसाचें मन अतिशय चंचल असल्यानें त्याला सुख-संपत्तीचा मोह व्हावा हें सहज शक्य आहे. पण निष्काम कर्म करण्याची जर सतत मनाला संवय लावून घेण्याचा निश्चय केला तर त्या चंचल मनावर देखील स्वामित्व मिळविणें शक्य आहे. अर्थात् ह्याला एक प्रकारच्या दृढ निश्चयाची आवश्यकता आहे; आणि अशा निग्रही स्वभावाच्या अभावीं जर असा सतत अभ्यास करणें कठीण वाटत असेल तर त्यांच्यासाठीं मीं भक्तीचा मार्ग सांगतों. अशा माणसानें जनताजनार्दनाची अनन्य-भावें भक्ति करावी. सतत जनतेचीं सुखदुःखें डोळ्यासमोर ठेवून जनतेची सेवा ह्या ना त्या प्रकारें करण्याचा उपक्रम करावा. जें कांहीं फल मिळेल त्याच्यासह सर्व कर्म त्यानें जनताजनार्दनालाच अर्पण करण्याचा परिपाठ ठेवावा. अशा तऱ्हेनें सर्व कर्में व त्यांचीं फळें जनतेलाच अर्पण केल्यानें सकाम कर्म करूनहि त्यामुळें स्वार्थ साधत नसल्यानें अशा भक्ताला निष्काम कर्म केल्याचेंच श्रेय मिळेल. ध्यानींमनीं सदोदित जनताच असल्यानें असा पुण्य-पुरुष हळूहळू जनतामय होऊन जाईल.

परंतु अशा निष्कामकर्मयोगाच्या अगर भक्तीच्या अभावीं स्वतंत्र हिंदुस्थानाची काय भयानक अवस्था झाली आहे पहा ! एकीकडे तत्वचिंतनपर राहून कार्य करणाऱ्या आणि त्यासाठीं राजकारणापासून अलिप्त राहाणाऱ्या महात्माजींच्या कांहीं एकनिष्ठ व सच्छील शिष्यवरांची काय स्थिति आहे ?








## ‘ हिंदी जनता झिंदाबाद ’

समाजांत त्यांना तसें काय स्थान आहे ? त्यांना त्या स्थानाची मातब्बरी नाहीं हें मी जाणतों. पण दीनदुबळ्या झालेल्या जनतेला अशा तत्त्वचिंतकांचा काय फायदा ? त्यांचे शब्दहि जनतेच्या कानीं जाण्याची आज परिस्थिति आहे का ?

ह्याउलट तत्त्वचिंतनापासून दूर राहिलेल्या व त्यामुळेंच निष्काम कर्मयोगाला मुकलेल्या ह्या सत्ताधीन श्रेष्ठींची अवस्था पहा. जनतेची सेवा ही आतां फक्त कागदावर व ओठावर तेवढीच शिल्लक राहिली आहे. जनतेची गांठ घेऊन त्यांचीं सुख-दुःखें जाणून घेण्याच्या गोष्टी आतां भूतकाळांत जमा झाल्या आहेत. गांधीजींचा आदर्श गव्हर्नर किंवा पंत-प्रधान आज कोठें आहे ? देशाला कापडाचा तुटवडा असूनहि एखादाच गव्हर्नर रोज सूत काढून इतरांना उदाहरण घालून देत आहे ? ह्या गोष्टीकडे लक्ष न देतां देशांतल्या अगदीं छोट्यांतल्या छोट्या राष्ट्रांत आपले प्रतिनिधी पाठविण्याची व निरनिराळ्या निमित्तानें शिष्टमंडळें सर्वत्र पाठविण्याची आम्हांला कोण घाई झाली आहे ! हे विचारी तरुणा, हिंदुस्थानचें आशास्थान आज तुझ्यासारखे तरुण आहेत. मनांतील सर्व संभ्रम काढून टाक आणि जनतेची सेवा निष्कामकर्मयोगानें वा भक्तियोगानें करण्याचें घोषवाक्य पुन्हां एकदां जोरानें ललकारून शत्रुपक्षाच्या हृदयाचा थरकांप उडव. ह्या जनता-जनार्दनाचें साहाय्य तुझ्या समाजवादाला आहे, भांडवलशाहीला नाहीं ही खूणगांठ मनाशी पक्की बांधून ठेव.

**तरुण** : जनार्दना, माझ्या मनांतले सारे संशय आतां पूर्णपणें फिटले. अगदीं वेळेवर माझ्या डोळ्यांत अंजन घालून तूं मला मार्गदर्शन केल्यामुळें आतां माझे डोळे पूर्णपणें उघडले आहेत. मी आतां अंधारांत चांचपडत नाहीं. समाजसत्तावाद स्थापण्यांतु कोणत्या मनोवृत्तीची जोपासना करणें आवश्यक आहे हें मला कळलें. आतां माझ्या मनांत असला संभ्रम कधींहि होणार नाहीं. ही निवडणूक जिंकण्यासाठीं, ही पहा, मी माझी लेखणी पुन्हां उचलली. निवडणुकींत यश येवो कीं न येवो, जनतेची भक्ति करण्यास मी कधींच विसरणार नाहीं. बोला “ हिंदी जनता झिंदाबाद ! ! आम जनता झिंदाबाद ! ! ”

---

## समाजवादाचा मार्ग

हिंदी राहणी इतकी निकृष्ट आहे कीं लाजेनें मान खालीं व्हावी ! १९३९ ते ४७ या काळांत पैशाच्या दृष्टीनें उत्पन्न दर माणशीं दरसाल ६७ रुपयांवरून १४३ वर गेलेसें दिसलें तरी खऱ्या अर्थानें उत्पन्न ६७ वरून ५९ वरच आलें. म्हणजे महिना पांच रुपये सरासरी उत्पन्न !

लोकांना खूप काम करा, असें सांगण्यापूर्वी बांडगुळांचा मिरासदार वर्ग—भांडवलदार वर्ग दूर करायला हवा, असें समाजवाद्यांचें म्हणणें आहे. भांडवलशाहीवर पडदा पडून समाजवाद पुढें येतांच एकदम चमत्कार होणार नाहीं; परंतु सामाजिक बदल होणें शक्य होईल. आणि अविरत परिश्रमानेंच त्या शक्यतेंतून प्रत्यक्षता प्रकट करता येईल.

समाजवाद म्हणजे सुखविलासाचा, ऐषआरामाचा मार्ग नसून तो कष्टाचा–श्रमाचा मार्ग आहे.

गांधीजी म्हणाले होते : ‘ आर्थिक विषमता दूर करा.’ त्यांच्या म्हणण्याप्रमाणें जास्तींत जास्त एका कुटुंबाला ५०० रुपये, एका माणसाला १०० रुपये जेव्हां मिळतील तेव्हांच जनतेला ‘ अधिक काम करा ’ सांगतां येईल आणि जनता ऐकेलही.

समानता आणल्यावरहि २० वर्षें तरी समाजवाद भरपूर देऊं शकणार नाहीं. वीस वर्षें कमी घेऊन अपार श्रमावें लागेल. तेव्हां पुढें सुखाचा घास. समाजवाद पुढें विपुल समृद्धीचें युग आणील ही गोष्ट खरी. परंतु आजच्या घटकेला तर कठिण जीवनच जगावें लागेल.

—श्री. अशोक मेहता, ‘ जनता ’वरून



अनुक्रमणिका

श्री. स. का. दीक्षित

# लोहयुग आणि संहितांची रचना

लोहयुगाला, कॉकेशस्–आर्मेनियन या भागांतील आर्मेनियन् नांवाच्या एका प्राचीन जमातीनें लोखंड सुलभ रीतीनें वितळविण्याची कला साध्य करून, व लोखंडी उपकरणें प्रथम उपयोगांत आणून, इ. स. पूर्वी १६ व्या शतकांत सुरुवात केली. हे आर्मेनियन हेच आदि–आर्य (Proto-Aryans) किंवा मूळचे आर्य किंवा 'हिंद-युरोपी' (Original Aryan or Indo-European) जमात होय. लोहयुगाचा अत्यंत प्राचीनतम वाङ्मयाशीं देखील जगभर निकटचा संबंध आढळून येतो. ज्या जमातींनीं (किंवा लोकांनीं) जगांतील अत्यंत प्राचीन वाङ्मय उत्पन्न केलें, त्यांच्यामध्यें प्रामुख्यानें " हिंद–युरोपी " भाषा बोलणाऱ्या जमातींचा अंतर्भाव होतो, व बाकीच्या उरलेल्या जमातींचा लोहयुगाला सुरुवात करणाऱ्या 'हिट्टाइटा' सारख्या जमातींशीं संबंध होता. लोहयुग हें त्या त्या वाङ्मयांत, अंशतः कां होईना, प्रतिबिम्बित दिसतें. तसेंच लोहयुगामुळेंच आदितम वाङ्मयांत 'वीर-युगाची' किंवा 'विजेत्या युगाची' (Heroic Age ची) छाया स्पष्टपणें दृग्गोचर होते. या सर्व गोष्टींचा हिन्दुस्थानांत आलेल्या 'आर्यां'च्या आदितम वाङ्मयावर (म्हणजे ऋग्वेदादि ग्रंथांवर) कसा काय प्रकाश पडतो, तें विचार करण्यासारखें आहे.

## 'अयस' चा मूळ अर्थ तांबें

'विजेत्या नव्या युगा'ची छाया प्राचीन हिंदुस्थानांतील सर्व वाङ्मयांत अधिक कोणत्या ग्रंथांत दिसत असेल तर ती ऋग्वेदामध्येंच. आपल्या शत्रूंना जिंकण्याकरतां, त्यांचा निःपात करण्याकरतां, किंवा त्यांचीं " पुरें " तोडण्याकरतां इंद्रादिदेवांना ऋग्वेदांत पदोपदीं आवाहन केलेलें आढळतें. याप्रमाणें इतर एकंदर साऱ्या प्रमाणांवरून-ऋग्वेदादि-ग्रंथांच्या रचनेच्या काळीं लोखंडाचीं उपकरणें (किंवा हत्यारें, अवजारें) उपयोगांत येत असावींत, म्हणजे लोहयुगाला सुरवात झाली असावी, असें दिसतें.

या दृष्टीनें प्राचीन संस्कृत वाङ्मयांत लोखंडाचा उल्लेख प्रथम केव्हां व कशा रीतीनें होऊं लागतो, या विषयाचा अभ्यास केल्यास बराच प्रकाश पडण्यासारखा आहे. इंग्रजी भाषेंतील " वैदिक सूचि (Vedic Index)" नांवाच्या, एका ग्रंथाचे कर्ते प्रा. मॅक्डोनेल आणि प्रा. कीथ या सुप्रसिद्ध पाश्चात्य पंडितांनीं 'अयस्' या शब्दाच्या निरनिराळ्या अर्थांचें स्पष्टीकरण करतांना, एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, ऋग्वेदांतील एका ऋचेंत 'अयस्' या शब्दाचा लोखंड असा अर्थ घ्यावा. परंतु ऋग्वेद-काळीं लोहयुगास प्रारंभ झालेला होता, असें आम्हांस अन्य पुराव्यावरून संभाव्य वाटत असतांना देखील, हें जाहीर करण्यास आम्हास खेद वाटतो कीं, प्रा. मॅक्डोनेल व प्रा. कीथ यांच्या या म्हणण्यास निश्चित स्वरूपाचा असा कांहींचाहि आधार नाहीं. 'अयस्' या शब्दाच्या अर्थाविषयीं त्यांनीं किंवा दुसऱ्या कोणत्याही पंडितानें केलेली चर्चा देखील यथार्थ नाहीं, हें नाइलाजानें कबूल करावें लागतें. म्हणून येथें ऋग्वेद कालीन संस्कृतीचा आर्थिक पाया कोणत्या स्वरूपाचा होता याविषयीं व विशेषतः 'अयस्' याच्या ऋग्वेदादि-ग्रंथांत आढळणाऱ्या अर्थाविषयीं थोडाफार सांगोपांग विचार करणें अयोग्य ठरणार नाहीं.

भाता असलेल्या भट्टयांच्या साहाय्यानें धातू वितळविण्याची कला ऋग्वेदकालीन आर्यांना

निश्चित ठाऊक होती, या विषयीं ऋग्वेदांत भरपूर पुरावा आढळतो. एका ऋचेंत (ऋ० १०·७२·२ मध्यें) एकाद्या "कर्मारा"नें भाता मारून धातूच्या मूर्ति बनवाव्यात, त्याप्रमाणें ब्रह्मणस्पतीनें देव बनविले असा उल्लेख आहे. अन्यत्र (ऋ. १·११७-२१) अश्विनीकुमारांविषयींच्या एका ऋचेंत भाता मारण्याचा उल्लेख आहे. सर्व धातूंमध्यें 'हिरण्य' (ऋ. १·२५·१३; शिवाय पहा १०·१२१·१) आणि 'अयस्' (ऋ. १·५२,८; ४·२·१७) या दोन धातूंचे सर्वांत अधिक उल्लेख केलेले आढळतात. 'हिरण्य' या धातूचा उल्लेख 'सवितृ' (ऋ. १·३५·९; ३·५४·११; १·२२·५), उषस् (ऋ. ३·६१·२; शिवाय पहा १·४८·९-१०) या सारख्या देव-देवतांचें, किंवा त्यांच्या रथांचें (ऋ. ८·५·२८-३५; शिवाय पहा ऋ. १·३५·२) वर्णन करीत असतांना प्रामुख्यानें सांपडतो; या वर्णनावरून 'हिरण्य' हा शब्द 'सोनें' या धातूच्या अर्थींच वापरला गेला आहे, ही गोष्ट स्पष्ट होते. ऋग्वेदांतील व इतर वेदांतील निरनिराळ्या उताऱ्यांत 'अयस्' या शब्दाचा अर्थ कोणता होता किंवा कसा बदलला या गोष्टीचा विचार करण्यापूर्वी आयझॅक् टेलर नांवांच्या एका ग्रंथकारानें आपल्या 'The Origin of the Aryans' या सुप्रसिद्ध ग्रंथांत (पृ. १३८) या शब्दाच्या मूळच्या अर्थाच्या बाबतींत निरनिराळ्या 'हिंद-युरोपी' भाषांतील तत्सदृश शब्दावरून जो प्रकाश पाडला आहे तो लक्षांत घेण्यासारखा आहे. तो म्हणतो :

"निरनिराळ्या 'हिंद-युरोपी' भाषांतून प्रचलित असलेल्या एका 'आर्यन्' शब्दाच्या या फैलावाचा (किंवा प्रसाराचा) अर्थ अजून स्पष्ट व्हावयाचा आहे......हा शब्द संस्कृत भाषेंमधील 'अयस्' हा असून, लॅटिन् aes, गॉथिक aiz, जर्मन erz, आणि इंग्लिश ore हे शब्द त्याच्याशीं संबद्ध आहेत. लॅटिन् aesचा अर्थ तांबें किंवा कांसें असा आहे तर गॉथिक aiz चा अर्थ पितळ किंवा कांसें असा आहे. संस्कृत 'अयस्'चा अर्थ प्रथम 'तांबें' असा होता, नंतर सामान्यतः कोणताहि धातु असा अर्थ झाला आणि शेवटीं लोखंड असा झाला, असें मानण्यांत येतें. तांबें या धातूचा शोध प्रथम लागला हें बरेंच संभवनीय आहे. आणि असें असेल तर त्याचें नांव सामान्य धातु-निदर्शक कां बनावें हें सहज समजण्यासारखें आहे. तें कसेंहि असले तरी ('अयस्' या शब्दाचा) मूळचा अर्थ 'लोखंड' असणें शक्य नाहीं."

## 'अयोदंष्ट्र' अग्नि

तांबें हाच धातु सर्वांत प्रथम मनुष्यप्राण्यानें मोठ्या प्रमाणांत उपयोगांत आणला, याविषयीं पुरातत्त्व-शास्त्राचाच काय, पण भाषाशास्त्राचाहि बराच पुरावा आहे. पण विस्तारभयास्तव येथें देत नाहीं. ऋग्वेदामध्यें 'हिरण्य' या धातूप्रमाणें 'अयस्' या धातूचा वारंवार उल्लेख येतो, असें वर म्हटलेंच आहे. कांहीं ऋचांमध्यें ह्या दोन्ही धातूंचा एकत्र उल्लेख करण्यांत आला आहे (ऋ. १·१६३·९; १·८८·५; ५·६२·७–८). तांबें हें प्राचीन काळीं, ताम्र–अथवा कांस्य–युगांत, सर्व धातूंमध्यें अधिक प्रचारांत असे; ज्या वेळेला लोह-युगास प्रारम्भ झाला, त्यानंतरहि कांहीं शतकें लोखंडापेक्षां तांब्याचाच उपयोग व्यवहारांत जास्त होत असे. तांब्याच्या उपकरणांची जागा लोखंडाच्या उपकरणांनीं घ्यावयास बराच कालावधि लागला. तांब्याच्या भांड्याकुंड्यांची जागा या किंवा दुसऱ्या कोणत्याही धातूनें हिंदुस्थानांत अजूनहीं पुरेशी घेतलेली नाहीं. या साऱ्या गोष्टी लक्षांत घेतल्या असतां, वारंवार उल्लेख आलेला आणि सोनें या धातूबरोबर एकत्र उल्लेख असलेला 'अयस्' हा धातु 'तांबें' हाच असला पाहिजे, लोखंड असणें शक्य नाहीं, ही गोष्ट पटण्यासारखी आहे. ऋग्वेदातील एका ऋचेंत (ऋ. १०·८७·२) अग्नि नांवाच्या देवतेला 'अयस्'च्या दाढा असल्याचें, तो 'अयो–दंष्ट्र' असल्याचें वर्णन आहे. येथें 'अयस्' या शब्दाचा 'तांबें' याखेरीज दुसरा कोणताहि अर्थ असणें शक्य नाहीं. कारण येथें तांब्यासारख्या तांबड्या दिसणाऱ्या अग्नीच्या ज्वालांचा उल्लेख आहे. ऋग्वेदांत एका 'रुरुशीर्ष्णी' बाणाचें मुख 'अयस्'चें असल्याचा एका ऋचेंत (ऋ. ६·७५·१५) उल्लेख आहे. या ठिकाणींहि 'अयस्'चा अर्थ तांबें असाच घेतला

पाहिजे; कारण अन्यत्र कोठेंहि ऋग्वेदामध्यें याखेरीज दुसरा अर्थ संभवत नाहीं हें आपण वर पाहिलेंच. बाणाचें टोंक लोखंडाचेंच असावयाचें अशी समजूत असल्यामुळेंच कीं काय, प्रा. मॅक्डोनेल आणि प्रा. कीथ् यांनीं आपल्या वैदिक सूचीमध्यें असें लिहिलें आहे कीं, अयस् या शब्दाचा या ऋचेंत लोखंड असा अर्थ आहे. पण साऱ्या 'ताम्र अथवा कांस्य'-युगीन देशांत बाणाचीं टोकें तांबें आणि कांसें यांचींहि बनविलेलीं आढळतात. एवढेंच नव्हे, तर लोहयुगाला प्रारंभ झाल्यावर देखील शेंकडों वर्षें अनेक देशांत बाणांचीं टोकें तांब्याचीं किंवा कांस्याचीं घडविलीं जात किंवा दगडाचींहि घडविलीं जात. लोखंड महाग असल्यामुळें, त्याचा 'शस्त्रें' बनविण्याकरतां उपयोग होई; 'अस्त्रें' (म्हणजे फेंकून मारावयाचीं शस्त्रें) बनविण्याकरतां अधिक स्वस्त पदार्थांचा उपयोग करण्यांत येई. या साऱ्या प्रमाणां-वरून 'अयस्' या शब्दाचा 'तांबें' याखेरीज दुसरा कोणताहि अर्थ कोणत्याहि ऋचेंत असल्याचा पुरावा नाहीं हें स्पष्ट होईल. या एकाच शब्दाचे त्याच ग्रंथांत एकापेक्षां अधिक अर्थ आहेत हें पुराव्यानें सिद्ध केल्याशिवाय मानतां येत नाहीं. एकूण ऋग्वेद-कालीं लोखंड माहीत होतें असा पुरावा 'अयस्' या शब्दावरून मिळत नाहीं; इतकेंच काय पण 'कांसें' हा धातू देखील ऋग्वेद-कालीं माहीत होता असेंहि या शब्दाच्या इति-हासावरून किंवा ऋग्वेदांतील उपयोगावरून सिद्ध होत नाहीं.

## ऋग्वेदोत्तर कालांतील 'अयस्'

ऋग्वेदांत 'कांस्य-युग' आणि 'लोह-युग' यांच्याविषयीं जो अन्य पुरावा आहे, तो सादर करण्याच्या आधीं, येथें 'अयस्' या शब्दाचा अर्थ ऋग्वेदोत्तर-कालांत कसा बदलत गेला, याविषयीं थोडक्यांत माहिती देणें युक्त आहे. अथर्व-वेद (११·३·१·७) आणि वाजसनेयि-संहिता (१८·१३) या दोन संहितांत 'श्याम' (म्हणजे काळें) आणि 'लोहित' (म्हणजे तांबडें) अशा दोनप्रकारच्या 'अयस्'चे उल्लेख आहेत. यावरून लोखंड आणि तांबें हे दोन्ही धातू या काळीं उपयोगांत येत होते, याविषयीं बिलकुल शंका रहात नाहीं. याशिवाय आणखी एका 'अयस्'चा त्यांच्याबरोबरच क्वचित् उल्लेख आढळतो. अर्थात् येथें या 'अयस्'चा या दोन्ही धातूंपेक्षां निराळा कोणतातरी धातु असा अर्थ घेतला पाहिजे, हें उघड आहे. 'श्याम' आणि 'लोहित' हीं नांवें अर्थातच त्या त्या धातूंच्या वर्णांवरून दिलेलीं होतीं. रजत (= पांढरें किंवा चकाकणारें), हिरण्य (= हिरवट पिवळें) इ० धातूंचीं नांवें अशींच सार्थ दिलेलीं दिसतात. पण ज्याचा रंग नीटसा वर्णन करतां येत नाहीं, असा किंचित् काळसर, भुरकट किंवा कर्बुर रंगाचा एक धातु राहिलाच; तो म्हणजे कांसें. याला वर्ण-वर्णन-पर चांगलेंसें नांव देतां येत नसल्यामुळें, इतर दोन प्रकारच्या 'अयस्' बरोबर याचा उल्लेख करतांना, याला नुसतेंच 'अयस्' असें म्हटलें आहे, व इतरांना 'ताम्र' किंवा 'लोहित' असें म्हटलें आहे.

नंतरच्या औपनिषदिक वाङ्मयामध्यें 'लोहिता-यस' याला 'लोहायस', आणि 'श्यामायस' याला 'कार्ष्णायस' अशींहि नांवें असल्याचें आढ-ळतें. या सगळ्या 'अयस्'मध्यें 'कार्ष्णायस' किंवा लोखंड हें जेव्हां स्वस्त होऊन, सर्वांत अधिक प्रचारांत आलें तेव्हां, म्हणजे लोह-युगाला प्रारम्भ झाल्यानन्तर बराच काळ लोटल्यावर, इतर कोणत्याहि धातूपेक्षां किंवा मिश्र धातू-( alloy )पेक्षां 'अयस्' हा शब्द लोखंडालाच लावणें सयुक्तिक वाटूं लागलें. अर्थात् 'अयस्' आणि 'कार्ष्णायस' हे शब्द अमरकोशादि-ग्रंथांत समानार्थक असे वापरण्यांत येऊं लागले, यांत आश्चर्य नाहीं.

वरील विवेचनावरून एवढी गोष्ट निश्चित होते कीं, अथर्ववेदसंहिता आणि यजुर्वेदाची वाजसनेयि-संहिता यांच्या रचनाकालीं 'श्याम' अयस् किंवा लोखंड प्रचारांत होतें. ऋग्वेदाचा रचनाकाल या दोन संहितांच्या रचनाकालापेक्षां पुष्कळच आधींचा असावा, असें समजण्यास फारसें कारण मिळत नाहीं. ऋग्वेदांतील बहुतेक भाग इतर साऱ्या वेदांपेक्षां आधीं रचला गेला असावा, असें मानण्यास मात्र





अनुक्रमणिका

कोणतीच हरकत दिसत नाहीं. दशम मंडलांतील व प्रथम मंडलांतील बरींच सूक्तें अथर्ववेद व यजुर्वेद या संहितांच्या आधीं लिहिलीं गेलीं किंवा नंतर लिहिलीं गेलीं, हें सांगणें मात्र फार कठीण आहे. याचा अर्थ असा कीं, ऋग्वेद-संहिता व या दोन संहिता यांच्या रचनेंत फारसा कालावधि लोटलेला नाहीं. हें अंतर फार तर २–३ शतकांचें असेल. ऋग्वेदांतील बाकीचीं मंडलें आणि हीं दोन (प्रथम व दशम) मंडलें यांच्यामध्यें एवढें अंतर पुरेसें आहे: आणि हीं दोन मंडळें व या दोन संहिता यांचा काल एकच असावा असें दिसतें. अर्थात् ऋग्वेद-कालीं लोखंड माहीत असणें संभवनीय दिसतें. निदान, या दोन संहितांच्या थोडें पूर्वी ऋग्वेद संहिता रचली गेली असें मानलें तरी ऋग्वेद-कालीं कास्यांचीं उपकरणें तरी वापरलीं जात होतीं, यांत बिलकूल शंका नाहीं. ऋग्वेदांत 'अयस्' या शब्दाचा 'तांबें' याखेरीज दुसरा कोणताहि अर्थ असल्याचें दिसत नाहीं, ही गोष्ट जरी खरी असली तरी त्या काळीं कांसें माहित नव्हतें असें मानण्याचें कारण नाहीं.

### ऋग्वेदकालांत मुंडणाची पद्धति

याविषयीं कांहीं पुरावा आहे काय, हाच मुख्य प्रश्न आहे. 'हिंद-युरोपी' भाषांपैकीं अनेक भाषांमध्यें 'तांबें' या धातूच्या निदर्शक असलेले शब्द एकसदृश आहेत, ही गोष्ट आपण पाहिलीच. पण याशिवाय, 'कथील' या अर्थी ग्रीक भाषेमध्यें Kassiteros असा जो शब्द आहे, तो संस्कृत भाषेंत 'कस्तीर' असा सांपडतो. यावरून 'हिंद-युरोपी' भाषा बोलणाऱ्यांच्या मूळ वसतिस्थानांत तांब्याप्रमाणें कथिल हेंहि सांपडत होतें यांत शंका नाहीं. याविषयीं आणखीहि कांहिं पुरावा उपलब्ध आहे. 'लोह युगाला प्रारम्भ आणि आर्यांचा उदय' या माझ्या दुसऱ्या लेखांत, 'हिंद युरोपी' भाषा बोलणाऱ्यांचें मूळ वसतिस्थान आर्मेनियांतील डोंगराळ प्रदेशाच्या आसपास होतें, असें निर्दिष्ट केलें आहे. आर्मेनियामध्यें व कॉकेशस पर्वतावर अन्यत्र, तांबें शुद्ध स्वरूपांत खूपच सांपडतें. इतकेंच नव्हें तर आर्मेनियांत Kassiterite उर्फ Oxide of tin हें पुष्कळ प्रमाणांत सांपडतें, असेंहि तज्ज्ञांनीं सांगितलें आहे. अर्थात् आर्मेनिया देशांत 'आर्यां' चें मूळ वसतिस्थान असावें, या म्हणण्याला येथें पुरावाचा मिळतो. पण त्याशिवाय असेंहि सिद्ध होतें कीं, कांस्य–युगीन संस्कृतीला प्रारम्भ झाल्यावरच आपल्या मूळ वसतिस्थानाहून ते निरनिराळ्या दिशांना गेले, त्याच्या आधीं नाहीं. कारण कांस्य-धातूचे दोन्ही घटक त्यांच्या परिचयाचे होते.

प्रस्तुत लेख लिहीत असतांना "आर्य आपल्या मूळ वसति-स्थानांतून बाहेर पडून इतस्ततः पसरले जाण्यापूर्वी त्यांना निदान कांस्ययुगीन संस्कृति परिचित होती" असा तर्क आम्ही प्रथम दुसऱ्याच कांहीं पुराव्याच्या जोरावर बांधला होता. तो पुरावा ऋग्वेदादि ग्रंथांत वारंवार आढळणाऱ्या 'क्षुर' 'भूरिजोः' इत्यादि शब्द-प्रयोगांशीं संबद्ध आहे. त्याविषयीं विस्तारभयास्तव येथें साद्यन्त चर्चा करीत नाहीं. तरी पण, ऋग्वेदकालीन आर्यांत, डोक्यावरील केस शिखेखेरीज अजिबात काढून टाकण्याची जी पद्धत होती ती पद्धत कांस्य–युगाच्या आधीं उत्पादन होणें शक्य नव्हतें. शुद्ध तांब्याच्या वस्तऱ्यानें साऱ्या डोक्याची हजामत करणें अशक्य आहे. कांस्याच्या वस्तऱ्यानें देखील पुष्कळ कठिण आहे. या वस्तुस्थितीच्या आधारावर आम्हीं असा तर्क साहजिकच काढला कीं, ऋग्वेदकालीं ज्या अर्थी मुंडनाची पद्धत बरीच प्रचलित होती त्या अर्थी लोहाचे नाहीं तर निदान कांस्याचे वस्तरे वापरले जात असावे.

याला आधाभूत असा आणखी कांहीं पुरावा सांपडतो. 'क्षुर' या शब्दासारखाच, त्याच अर्थी एक शब्द ग्रीक भाषेंत आहे. अर्थात् मुंडनाची, निदान लखेंडी वस्तरा वापरण्याची पद्धत मूळ आर्यांमध्यें प्रचलित होती हा स्वाभाविक तर्क आहे. वस्तुस्थिति अशीच आढळते कीं, आर्मेनियांतील हिट्टाइट ऊर्फ खत्ती हेहि सध्याच्या ब्राह्मणांप्रमाणें शिखा धारण करीत आणि बाकीच्या डोक्याचें सफाईदार मुंडन करीत असें त्याच्या चित्रित आणि निम्नोत्कीर्ण आकृती(Representations)-वरून स्पष्ट दिसून येतें. लोखंडाच्या पात्यानेंच सफाईदार मुंडन करतां येतें ही गोष्ट लक्षांत घेतली असतां हिट्टाइटांप्रमाणें

ऋग्वेदकालीन आर्यांना लोखंड चांगलेंच परिचित होतें असें समजणेंहि फारसें चुकीचे होणार नाहीं.

प्रस्तुत लेखांत वर एके ठिकाणीं ' कर्मार ' भट्टीचा भाता मारतो, अशा अर्थाचा वेदांत उपमात्मक उल्लेख असल्याचें लिहिलें आहे. 'कर्मार' या शब्दाचा मूळ अर्थ नुसता ' smith 'असा किंवा ' black-smith ' ( लोहार ) असा आहे, हें सांगणें कठीण आहे. नंतरच्या काळांतील ' शिष्ट संस्कृत '-( Classical Sankrit ) मध्यें 'कर्मार' या शब्दाचा अर्थ ' black-smith ' किंवा ' लोहार ' असा होता, हें प्रसिद्धच आहे. अर्थात् ऋग्वेद-कालीं देखील तोच अर्थ प्रचलित असावा असें मानणें अयोग्य होणार नाहीं. असें असेल, तर ऋग्वेद-कालीन आर्यांचा लोह-युगीन संस्कृतीशीं चांगला परिचय असल्याबद्दल येथें आपणास अधिक पुरावा आहे.

वरील साऱ्या प्रमाणांवरून इतर देशांतील आदितम वाङ्मयाप्रमाणें व हिंदुस्थानांतील यजुर्वेद-संहिता अथर्ववेद-संहिता इ. ग्रंथांप्रमाणें ऋग्वेद-संहिता देखील लोहयुगाला प्रारंभ झाल्यानंतरच उत्पन्न झाली. याप्रमाणें जगांतील आदितम वाङ्मयाचा लोह-युगाच्या उदयाशीं निकटचा संबंध आहे, या सामान्य नियमास ऋग्वेद-संहिता ही एकटीच अपवाद होती, असें फारसें सम्भवत नाहीं.

---

## हिंदुस्थानचें परराष्ट्रीय धोरण खरोखरींच तटस्थतेचें आहे काय ?

एका माणसाचा खेळ आहे.
स्वतंत्र हिंदुस्थानचें परराष्ट्रीय धोरण म्हणजे एकखांबी तंबू आहे, कविमनाची झेंप विशाल असते, कवीला प्रतिभेची
त्यांत पं. नेहरूंचें काव्यमय मन प्रतिबिंबित होतें. अंतःस्फूर्ति असते आणि त्यांत ध्येयवादाचीही छटा असते.
देणगी असते, योग्य वेळेला योग्य गोष्ट करण्याची व त्याच्या कृतींत पद्धतशीरपणा नसतो. प्लेटोचें असें
परंतु कित्येक वेळां कवीला व्यवहार जमत नाहीं हें प्लेटोचें सुखस्वप्न पं. नेहरू पूर्ण करूं शकले नाहींत
सुखस्वप्न होतें कीं तत्त्वज्ञान्यांनीं राज्यकारभार करावा. वस्तुनिष्ठ चौकटींत पद्धतशीर विचार कर
हें खरें. कारण तत्त्वज्ञान्यांच्या अंगीं इतर गुणांबरोबरच एका कवि–तत्त्वज्ञानी नव्हे–हिंदुस्थानवर राज्य करीत आहे.
ण्याचीही संवय असते. पं. नेहरूंच्या रूपानें एक सामील न होतां आमचें धोरण तटस्थेतेचें ( Neutra-
राजकारणांतील दोन सत्ताबाज गटांपैकीं कोणांतही तटस्थतेच्याही दोन बाजू असूं शकतात.कोणत्याही
lity चें) राहील, यावर पं. नेहरूंचा नेहमीं कटाक्ष आहे. अकरणात्मक ( negative ) बाजू. तटस्थतेची
गटाला दुसऱ्याविरुद्ध पाठिंबा न देणें ही तटस्थेची बाजू आहे. ती म्हणजे ज्याची बाजू न्यायाची
दुसरीही एक विधायक आणि शक्तिशाली ( dynamic ) विधायक बाजूकडे झुकल्यामुळेंच हिंदुस्थाननें एक
असेल त्याला पाठिंबा देणें. तटस्थतेच्या या शक्तिशाली बनविला असून त्याला मुख्य आधार आग्नेय आशिया-
तिसरा शक्तिशाली गट ( the third force ) ची निर्मिति जगाच्या दृष्टीनें एक शुभचिन्ह
मधील राष्ट्रांचा आहे. या तिसऱ्या शक्ती-( third force ) सामील होऊन शेवटीं दोन गटांतच
आहे. कारण युद्ध व्हायचें म्हणजे निरानिराळ्या शक्ती दोन गटांतच दोन गटांच्या रूपानें होऊं नये, असा हिंदु-
युद्ध होत असतें. म्हणून भिन्न भिन्न मतभेदांची वांटणी केवळ जीवन सुलभ होतें. त्यांचे दोन गट झाले
स्थानचा प्रयत्न आहे. अनेक मतभेद नांदूं देण्यानेंच लोकशाहीचें मानीत नाहीं;उलट पक्षीं हिंदुस्थान
कीं खटका उडालाच! हिंदुस्थानचें धोरण तटस्थतेचें आहे, असें राशिया आंतरराष्ट्रीय परिषदांतून हिंदुस्थानची
आपल्या बाजूचा आहे, असें अमेरिकेला वाटत नाहीं. त्यामुळें एक तर आपण युद्धांत ओढले
स्थिति एकाकी अशी आहे. युद्ध पेटलें तर आपली स्थिति काय होईल ? झपाट्यानें उद्योगधंदे वाढवून
जाऊं, किंवा आपला देश कोणीतरी लष्करी तळ म्हणून व्यापून टाकील. राष्ट्रकुटुंबाशीं एक
नेहरू-सरकारला जनतेचें जीवनमान वाढवावयाचें आहे. उद्योगधंदे वाढविण्याकरितां आमच्या मनोवृत्तीचा कल
प्रकारचें नातें नेहरू-सरकारनें कायम ठेविलें आहे. कितीही नाहीं म्हटलें तरी
अँग्लो-अमेरिकनांकडे झुकलेला स्पष्ट दिसतोच.

—डॉ. कृष्णलाल श्रीधराणी, ४–७–४९



अनुक्रमणिका

श्री. माधवराव बागल

# चित्रकलेंतील नवें पर्व

अलीकडे 'मॉडर्न आर्ट' 'आधुनिक चित्रकला' या नांवाखालीं जो एक नवा प्रकार सुरू झाला आहे त्यानें चित्रकलेंत मोठीच क्रांति घडून आली आहे. नवशिक्या विद्यार्थ्यांवर व नव्या पिढीवर त्याचे चांगले तसे वाईटही परिणाम होत आहेत. या प्रकारांतील नावीन्यामुळें ठराविक पद्धतीनें काम करणाऱ्या गेल्या पिढींतील कलावंतांना खरोखरीच मोठा धक्का बसला आहे. ही नवी पिढी कुठें चालली आहे हे त्यांना समजणें मोठें अवघड होऊन बसलें आहे. सर्वसाधारण कलाप्रेमी जनताही बुचकळ्यांत पडली आहे. ज्यांनीं आतांपर्यंत पूर्वीच्या नामवंतांचीं चित्रें पाहिलीं आहेत त्यांनाही कांहीं समजेनासें झालें आहे. पाश्चिमात्य राष्ट्रांतील ही नवी लाट इकडेही डोकावूं लागली आहे. तेव्हां यामागील भूमिका काय आहे, हा कांहीं ठराविक तंत्रांना धाब्यावर बसविणारा प्रकार कां डोकावूं लागला आहे हें समजून घेणें आवश्यक झालें आहे. याकरितां थोडें मागें पहावें लागेल.

अगदीं प्रथमावस्थेंत पशु, पक्षी, माणूस यांचीं बोध होणारीं ठोकळ आकृतींचीं चित्रें आढळून येत. त्या वेळची लढाई, शिकार याही चित्रांतून प्रकट होत. त्या त्या वस्तूंचें मनावर झालेलें चित्रण हेंच कलावंताच्या हस्तकौशल्यानें मूर्त स्वरूप धारण करी. केवळ आठवणीवरच भर दिल्यामुळें पशु, पक्षी, माणूस व पाहिलेल्या वस्तू यांचें वैशिष्ट्य मनानें आकलन करण्यांत तो तरबेज झाला; यामुळें त्या वेळच्या कलेंत फार साधेपणा दिसून येतो. बारीक सारीक खांचाखोंचीकडे लक्ष देणें त्याला शक्यच नव्हतें. यामुळें भव्यता, सुलभता, साधेपणा हे महत्त्वाचे व आवश्यक गुण त्यावेळच्या कलेंत प्रामुख्यानें साधले आहेत. हल्लींच्या शाळेंतील क्रमिक अभ्यासामुळें हे आवश्यक गुण कमी झाले आहेत. पुष्कळ चित्रकार या महत्त्वाच्या अंगांकडे दुर्लक्ष करून बारीक सारीक गोष्टींकडे लक्ष देतात आणि चित्रांतील आत्माच नाहींसा करतात. त्याचें चित्र फोटोग्राफच्या धर्तीवर जातें. आज पुनः या गोष्टींचा विचारपूर्वक अभ्यास करण्याची वेळ आहे.

या पहिल्या अवस्थेनंतर मनुष्याच्या मनावर धर्मसमजुतींचा पगडा बसूं लागला. देवादिकांच्या कल्पना, धर्मग्रंथ, पुराणें, कल्पित अद्भुत गोष्टी मनावर परिणाम करूं लागल्या. परिस्थितीचा व समाजरचनेचा परिणाम हा कोणालाहि चुकवतां येत नाहीं. यावेळीं कलावंतांच्या हातून धार्मिक चित्रें, पुराणांतील प्रसंग, देवतांचीं चित्रें, धार्मिक कल्पना बाहेर पडूं लागल्या. पाश्चिमात्य तशाच पौर्वात्य चित्रकलेवरही हेच परिणाम दिसून येतात. चिंतन, मनन व ध्यान यांतून यावेळची कलाकृति बाहेर पडली.

यानंतर राजशाहीनें केलेला आपल्यासाठीं राबवून घ्यायला सुरुवात केली. स्वतःची हौस भागवणें व आपल्या ऐश्वर्याचें प्रदर्शन करणें यासाठीं कलावंतांना नोकरीस ठेवलें, आश्रय व उत्तेजन दिलें. धर्मगुरूंनीही आपल्या संपत्तीचा उपयोग देवळें रंगवून घेण्यांत केला. राजे व धर्मगुरू आपआपलीं चित्रें काढून घेऊं लागले. यामुळें कलेंत 'पोर्ट्रेट'ला स्थान प्राप्त झालें. दरबारचे प्रसंग, अश्वारूढ चित्रें यांमुळें कलेंत प्रत्यक्ष वस्तुनिदर्शन ( Realism )आलें. कल्पनेला प्रत्यक्षाची जोड मिळूं लागली. देवादिकांचे आकार, पौराणिक व ऐतिहासिक प्रसंग दाखवतांना प्रत्यक्ष समोर दिसणाऱ्या जिवंत मानवी आकृतींचा

व वस्तूंचा कलावंत उपयोग करून घेऊं लागला. कल्पनेला प्रत्यक्षाची जोड मिळूं लागली. निर्दोष मानवी आकाराला देवतांचें स्वरूप देण्यात येऊं लागलें. पूर्वीच्या बहुतेक चित्रांत दोनच बाजू असत. आतां लांबी-रुंदीबरोबर खोली, अंतर हीं येऊं लागलीं. वस्तू दिसतील तशा काढण्याकडे श्रम खर्च होऊं लागले. छाया-प्रकाशाचा पूर्वी दिसणारा अभाव नाहींसा होऊं लागला. काल्पित चित्रांत प्रत्यक्ष'मॉडेल'चा उपयोग करण्यांत येऊं लागला. चित्रकलेंतील ध्यानाचें आसन ढळूं लागलें. पूर्वी अंतर्मुख दृष्टि होती ती बहिर्मुख होत चालली. परिस्थितींप्रमाणें ध्येयांतहि बदल होऊं लागला.

चित्रकारांच्या कृती खपायच्या, त्यांना नोकरी लागायची ती वरच्या श्रीमंत वर्गांत, विशेषतः राजे, सरदार व धर्मगुरू यांच्याकडे. त्यामुळें यावेळेपर्यंतच्या चित्रांत खालच्या वर्गाच्या जीवनाचे प्रसंग येऊंच शकले नाहींत. कलेला स्थिरता आली. कलावंताला आर्थिक व सामाजिक दर्जा प्राप्त झाला; यामुळें कलेच्या विकासाकडे त्यांना विशेष लक्ष देतां आलें. कलेचा दर्जा खूपच वाढला. मनाजोगें चित्र तयार करायला भरपूर वेळ देतां आला. पण यावेळची चित्रकला ही श्रीमंताची बटीक झाली होती. श्रीमंतास खूष करण्याकरतांच ती आपली बुद्धि खर्च करीत होती.

राजशाहीनंतर लोकशाहीचा काल आला. कलेचें ठराविक गिऱ्हाइक जाऊन तेथें दुसरें गिऱ्हाइक आलें. राजेमहाराजांच्या ठिकाणीं शेठ-सावकार आले. यामुळें कलेंतला राजशाही थाटमाट कमी झाला. कांहीं मोठ्या व्यक्तींची आराधना कमी होऊन तेथें वर्ग आला. पण अर्थात् तो धनिकवर्ग आला. धनिकवर्गाच्या आवडी-निवडी कलेंत शिरल्या. त्यांच्या घरगुती नित्याच्या प्रसंगांना व आवडीच्या गोष्टींना कलेंत स्थान प्राप्त झालें. फुलदाणींत फुललेल्या रंगीबेरंगी फुलापासून ते दिवाणखान्यांतील साध्या दिनक्रमापर्यंतच्या वस्तू कलावंताच्या कुंचल्यांतून बाहेर पडूं लागल्या. कलेनेंही लोकशाही स्वरूप स्वीकारलें. राजाचा व धर्मगुरूचा 'पोर्ट्रेट' जाऊन त्या ठिकाणीं श्रीमंत, मध्यमवर्ग व लोकसेवक यांचीं चित्रें दिसूं लागलीं. निसर्ग-चित्रांनाहि गिऱ्हाइक मिळूं लागलें. पैसा असणारा माणूस आपल्या आवडीचीं चित्रें घेऊं लागला. श्रीमंत गिऱ्हाइक कमी होऊन तेथें मध्यमवर्ग येऊं लागल्यामुळें चित्रांची किंमतही कमी करावी लागली व नुकसानभरपाईसाठीं चित्रांची संख्या वाढूं लागली. त्यामुळें त्यावर पूर्वी दिलेला वेळ व श्रम हीं त्या प्रमाणांत कमी झालीं. पण कलावंत वाढले व चित्रांची संख्याहि वाढली. एकाच चित्रावर वर्षानुवर्षे खर्ची घालणें अशक्य झालें. निसर्ग-चित्रकार जास्ती दिसूं लागले. व्यापारी धंद्यासाठीं कलेचा उपयोग करून घेऊं लागले.यामुळें कलेचा प्रसार वाढूं लागला. पण ती पूर्वीच्या दर्जापासून ढळली. रॅफेल, मायकेल अँजेलो, लिओनार्डो डा व्हिन्सी, टिशियन, व्हॅन्डाइक यांसारख्या अमर कलावंताची खाण कोरडी पडत चालली. तथापि यांतून अधूनमधून प्रतिभावान् कलाकार डोकें वर काढीच.प्रतिभावान् हा परिस्थितीशीं झगडून वर आल्याशिवाय रहात नाहीं. असे कलावंत प्रत्येक शतकांत पुढें येत असतात. पण हे अपवाद होत. वरील वर्णन केलेली परिस्थिति ही सर्वसाधारण कलावंताची होय.

लोकशाहीनंतर जग आतां समाजवादाकडे झुकूं लागलें आहे. समाजांतील अगदीं खालचा श्रमजीवी वर्ग जागा होऊ लागला आहे; हक्कांसाठीं धडपडूं लागला आहे; दंगा करूं लागला आहे; आपला असंतोष प्रकट करूं लागला आहे. शिष्टाचाराचीं बंधनें तो पाळूं इच्छीत नाहीं. भाषेंतला, विचारांतला, आचारांतला पोक्तपणा व गोडवा त्याला माहिती नाहीं. त्याचा आचार, विचार व कृति असंस्कृत आहे. त्याबद्दल विचार करण्याची त्याला फुरसत नाहीं, आज जरूर वाटत नाहीं. शिक्षणाभावीं त्याची भाषा सुसंस्कृत नाहीं. वाचन-मनन-चिंतनाभावीं त्याचे विचार परिपक्व नाहींत. सर्व बाजूंनीं चिरडल्यामुळें तो भडकून गेला आहे. सुखासीन सुसंस्कृत वर्गाला त्यामुळें कसेंसेंच होऊन गेलें आहे. त्याला हा निव्वळ अविचार दिसतो!

याच खालच्या समाजाच्या विचाराचें व परिस्थितीचें प्रतिबिंब आधुनिक चित्रकलेवरही पडलें आहे. अशिक्षित असंस्कृत मनुष्य आपल्या खेळदार

मार्पेत आपले विचार व भावना प्रकट करूं लागला म्हणजे जुन्या पिढींतल्या सुसंस्कृत मनाला धक्का बसावा, त्याप्रमाणें या आधुनिक कलेचा जुन्या जमान्यांत वाढलेल्या मनाला धक्का बसत आहे.

आधुनिक चित्रांत कष्ट, कौशल्य आणि चिंतन यांपेक्षां भावनेचा भडकपणा, साधन व कौशल्य यांविषयींची बेपर्वाई, परंपरेविषयींचा तिटकारा व ठराविक नियमांविरूद्ध बंडखोरी दिसून येते. रेषा, रंग व रचना यांचीं बंधनें तुटल्यासारखें वाटतें. या नव्या तऱ्हेचीं कांहीं विक्षिप्त चित्रें पाहून, भिकाऱ्यांचीं भांडणें चालल्याचा भास होतो. ज्याचा अभ्यास नाहीं, शास्त्र माहीत नाहीं त्यानें आपले विचार येतील तसे रेखाटावे, तशीं हीं चित्रें वाटतात. यांतून कांहींच चांगलें निष्पन्न होत नाहीं असें नाहीं. अडाण्याचे विचार केव्हां केव्हां जाणत्यांना मागें टाकतात. चिपळुणकर जाडे विद्वान् होते; सुसंस्कृत होते. पण महात्मा फुल्यांच्या विचारांशीं तुलना केली म्हणजे ते जुनेपुराणेच वाटतात. तेच फुल्यांचे विचार शंभर वर्षांपुढचे वाटतात. तेव्हां या आधुनिक चित्रकलेंत तंत्रदृष्ट्या दोष दिसले तरी वैचारिक दृष्ट्या ते मागें असतील असें म्हणतां येणार नाहीं. तंत्रदृष्ट्या ते मागें असणें साहजिकच आहे.

पूर्वी कलेच्या गुणावगुणांच्या चिकित्सेचे ग्रंथ किंवा प्रबंध अस्तित्वांत नव्हते; मार्गदर्शक ग्रंथ नव्हते, चित्रशाळा नव्हत्या. पण त्यावेळीं कलेची व कारागिरांच्या धंद्याची सांगड असे. कसबी सोनार लोहार, पाथरवट, रंगारी यांच्या धंद्यांतून होतकरू कलावंताला तांत्रिक शिक्षण सहजासहजींच मिळूं शके, पण यांत्रिक युगामुळें कारागिरांच्या धंद्यावर परिणाम झाला. धंद्याचीं हत्यारें यंत्रांतूनच तयार होऊं लागलीं. धंद्याला व्यापारी स्वरूप आल्यामुळें त्यांतील कौशल्य साहजिकपणें कमी झालें. माल जास्ती निघायला पाहिजे व स्वस्तांत पडायला पाहिजे ही व्यापारी नीति. ही भांडवलशाही नीति कारागिरांच्या धंद्यावर, अस्तित्वावर, जीवनावर व धंद्यावर परिणाम करूं लागली. उच्च कलेच्या उत्कृष्ट नमुन्यांऐवजीं बाजारी खपाच्या स्वस्त कलाकृती बाहेर पडूं लागल्या. मनन, चिंतन आणि अभ्यास यांतून बाहेर पडणारी कलाकृति मागें पडूं लागली.

आधुनिक चित्रकलेवर हे सर्व परिणाम कमी-अधिक प्रमाणानें दिसून येतात. 'आउटलाइन'कडे दुर्लक्ष, रंगावर भर व चित्र पुरें करण्याची घाई हे ठराविक दोष अलीकडच्या चित्रांत दिसून येतात. व या दोषांना तात्त्विक मुलामा चढविण्याकडे कल दिसून येतो. पण या आधुनिक कलेंत सर्वच गोष्टी टीकास्पद आहेत व त्यामुळें कलेची अधोगति होत आहे असेंहि म्हणतां येणार नाहीं. यांतून कला-शास्त्रांत भर पडली आहे. पूर्वीच्या पद्धतींतील दोषां-कडे लक्ष वेधलें गेलें आहे.

आधुनिक कलेनें रंगसृष्टींत पुष्कळ भर घातली आहे. रंगाच्या वापरांत नवे नवे शोध लागले आहेत. रंग वापरण्याच्या पद्धतींत मोठी क्रांति घडवून आणली आहे. रंगांच्या गुणांचें शास्त्रीय संशोधन केलें गेलें आहे. रंगमिश्रणांत बदल झाला आहे. फोटोग्राफीचे कलेवर होणारे दुष्परिणाम काढून टाकण्याची खटपट होत आहे. फोटोग्राफीची बारीकसारीक दृष्टि जाऊन ती दृष्टि विशाल झाली आहे. 'आउट-लाइन'मधील किचकटपणा जाऊन तींत भव्यता व साधेपणा आला आहे. ईजिप्तच्या प्राचीन चित्रकलेंतील भव्यता, गांभीर्य व साधेपणा अनुकरणीय वाटत आहेत. थोडक्यांत पुष्कळ दाख-विण्याची धडपड चालू आहे. समोर दिसतील त्या गोष्टी बरहुकूम दाखविण्यापेक्षां त्या देखाव्याचे मनावर होणारे परिणाम दाखविण्याचा प्रयत्न होत आहे. चित्रांत पूर्वींहून भावना, गति, कल्पना, ध्येय आण-ण्याचा अधिक प्रयत्न होत आहे.

मोडतोडीनंतर व्यवस्थित बांधकामाला सुरुवात होतेच होते. तद्वत कलेलाहि स्थिरता प्राप्त होऊन नव्या-जुन्यांचा गोड संगम हा होईलच. तंत्राकडे होणारें आजचें दुर्लक्ष हळूहळू कमी होईल. नव्या समाजरचने-ला स्थिरता प्राप्त झाली कीं कलेचेंहि स्वरूप निश्चित होईल व नव्या युगाची परिपक्व कला उदयास येईल.

---



अनुक्रमणिका

गोऽएटेनें 'फाउस्ट'ला जोडलेलें समर्पण

# "रूपें हीं तुमचीं—!"

[गोऽएटेनें आपल्या 'फाउस्ट' या महाकाव्याच्या पहिल्या भागाला जें समर्पण (Dedication) म्हणून जोडलें आहे, तें एक केवळ स्वतंत्र भावगीत (Lyric) म्हणून इ. स. १७९७ सालीं त्यानें प्रथम लिहिलेलें होतें. खालीं दिलेला त्याचा अनुवाद मूळाला अगदीं काटेकोरपणें धरून केलेला नाहीं. मराठी वाचकांना समजावा अशा दृष्टीनें जरा सढळपणानेंच केलेला आहे. शार्दूलविक्रीडिताचा उपयोग चार ओळींचें वृत्त म्हणून येथें केला नसून आर्यावृत्ताप्रमाणें दोन ओळींचें धांवतें वृत्त असा केलेला आहे. —अनुवादक]

रूपें हीं तुमचीं पुन्हां, प्रियसुहृत्! दृष्टीपुढें नाचतीं।
तेजें अंधुक दृष्टिला उजळितीं, प्रत्यक्षशीं भासतीं ॥ १ ॥

यावेळीं कवटाळुं का, करुं तुम्हां मी बद्ध प्रेमें बळें।
वेडा मोह खरा, परी तळमळे आशा, मुळीं ना वळे ॥ २ ॥

मायामोह असा अजूनि तुमचा ही भूल घाली, करी
सर्वस्वीं जन आपुला, म्हणुनि का आंदोलतां अंतरीं ॥ ३ ॥

चालूं द्या मग तो प्रभाव तुमचा, ये कोठुनी, कां, कसा?।
जाणेना, परि तो प्रकंपित करी, हर्षें भरी मानसा ॥ ४ ॥

अंगीं जोम नवा स्फुरे, उसळुनी तारुण्यही येतसें।
जादू ही! तव चिंतनीं प्रगट हो, सामर्थ्य दावी असें ॥ ५ ॥

गोष्टी संस्मरणीय गोड स्मरती त्वत्संगमीं राहतां।
दृश्यें सुंदरही, सुखांत असतां जीं जाहलों सेवितां ॥ ६ ॥

प्रीतीची पहिली मजा, प्रथमचा तो स्नेह,—त्यांचे स्वर
आलापीं विरती, विरे मनि जसें गाणें जुनें सुस्वर ॥ ७ ॥

दुःखें आठवतीं, मनीं उसळतीं आक्रंदनें आर्त तीं।
आयुःपंथ किती सुदुस्तर कटु ही हो पुनर्जागृति ॥ ८ ॥

दैवें जे हरिले, भरांत असतां, आप्तेष्ट माझे जन।
ते ते आठवती, कसे विरहिं या गेले मला लोटुन ॥ ९ ॥







गाणीं आवडिनें पुरासमार्थे मी ज्यांच्या पुढें गायिलीं ।
ते आतां नसती, पुढील मम हीं—हो !—पोरकीं राहिलीं ॥ १० ॥

गेले पांगुनिया विहंगमगती व्योमीं कुठें ना कुठें ।
आतां ते मृदु चार शब्द कुठचे ! आतां स्वतः ते कुठें ? ॥ ११ ॥

वीणा ही मम शारदीय परि ती हे ऐकती पारखे ।
त्यांचे गौरवशब्द—तेहि हृदया कीं वेदनांसारिखे ॥ १२ ॥

गीतें हीं मम ऐकुनी स्वजन जे आनंदले डोलले ।
ते आतां असले तरी असति ते चोहींकडे पांगले ॥ १३ ॥

उत्कंठा नव एक, वृत्ति अखिला घेरी—अपूर्वाच ती ! ।
नेई उन्नत त्या प्रशांत सदना जेथें मृतात्म्यां गती ॥ १४ ॥

गीतांचा मम सूर कंपित निघे, जैसा सुमंदानिल ।
खेळे नाजुक एकतारिवरि, तो लीला करी चंचल ॥ १५ ॥

वाहे संतत अश्रुपूर नयनीं, खंबीर हें हृन्मम ।
होवोनी मृदुभावनेस वश या, त्याचा सुटे संयम ॥ १६ ॥

सांनिध्यांत ममत्व तें बघत मी दूरस्थ होवोनियां ।
गेलें तेंचि गमे मला मम असें, अस्तित्व पावोनिया ॥ १७ ॥

अनुवादक : श्री. त्र्यं. सी. कारखानीस

---

**'स्वैरविहंग'**

Her wistful face haunts my dreams like the rain at night.

—" *Stray Birds* "— R. Tagore.

लावण्यलते, तव विलोल, आर्त, प्रशान्त
भावश्रीपूर्ण नि उत्कंठित मुखचंद्र
रंगवी रुपेरी मम स्वप्नांची माला
जणुं गभीर श्यामल रजनीच्या सांगातीं
जलधारा अविरत नाचत थयथय येती ॥

—अनुवादक : श्री. मा. गो. काटकर, सोलापूर





अनुक्रमणिका

प्रा. ए. रा. धोंगडे

# पौंड व रुपया यांचें अवमूल्यन

१९ सप्टेंबर १९४९ हा दिवस चालू शतकाच्या आर्थिक इतिहासांत फार महत्त्वाचा समजला पाहिजे. त्या दिवशीं ब्रिटिश पौंडाचें डॉलर-मूल्य ब्रिटननें कमी केल्याची घोषणा सर्व वर्तमानपत्रांतील मथळ्यांतून फडकली. आतापर्यंतचें एक पौंड म्हणजे चार डॉलर व तीन सेंट हे १९४६ मध्यें ठरविलेलें प्रमाण यापुढें एका पौंडाबरोबर दोन डॉलर व ऐंशीं सेंट असें राहणार. पौंडाचें अवमूल्यन ( Devaluation ) केल्याशिवाय ब्रिटनला गत्यंतर नाहीं असें मत कांहीं तज्ज्ञांनी आगाऊच व्यक्त केलें होतें. विशेषेंकरून अमेरिकेंत तर ही मतप्रणाली गेले तीन-चार महिने आग्रहपूर्वक प्रतिपादली जात असे. परंतु पौंडाच्या मूल्यांत कपात केली जाणार नाहीं असें स्पष्ट शब्दांत ब्रिटनचे अर्थमंत्री सर स्टॅफोर्ड क्रिप्स यांनीं कांहीं दिवसांपूर्वीच जाहीर केलें होतें. तरीसुद्धां डॉलर-पौंड पेंचप्रसंग सोडविण्यास पौंडाच्या अवमूल्यनाखेरीज दुसरा मार्गच न उरल्यामुळें अखेर हा निर्णय ब्रिटनला घ्यावा लागला.

## डॉलर-पौंड पेंचप्रसंग

ब्रिटन, ऑस्ट्रेलिया, हिंदुस्थान, सिलोन वगैरे राष्ट्रकुटुंबांतील देश अमेरिकेशीं बराच व्यापार करतात. अमेरिका सधन, सुसंपन्न व बहुतांशीं स्वयंपूर्ण असल्यानें अमेरिकेकडून येणारा माल अमेरिकेस जाणाऱ्या मालापेक्षां कितीतरी अधिक असे. अर्थात् या मालाचें दाम देण्यासाठीं डॉलर्सचा संचय पाहिजे. राष्ट्रकुटुंबांतील सर्व देशांचे डॉलर्स एकत्रित करून त्यांच्या गरजा त्यांतून पुरविण्याचें काम पौंडी गटाचा बँकर या नात्यानें ब्रिटनला करावें लागे. शिवाय ब्रिटनजवळ असलेला सुवर्णसंचय हा सुद्धां ब्रिटिश पौंडाला उचलून धरण्यास मदत करी. सोनें व डॉलर्स यांची ही गंगाजळी समाधानकारक असेपावेतों पौंडाचें महत्त्व कमी होण्याची भीति बाळगण्याचें ब्रिटनला कारण नव्हतें. परंतु गेल्या कांहीं वर्षांतील व्यापार-व्यवहाराचा परिणाम या गंगाजळीला गळती लागण्याकडे झाला. १९४६च्या सुरवातीस या गंगाजळींत ६१·२ कोटी पौंड किंमतीचें सोनें व डॉलर्स होते. साडेतीन वर्षांच्या कालावधींत म्हणजे जून १९४९ अखेरपर्यंत २०·६ कोटी पौंडाची गळती होऊन हा निधि ४०·६ कोटी पौंडापर्यंत उतरला. याच कालावधींत पौंडी गटाला युनायटेड स्टेट्स व कॅनडा यांचेकडून कर्जाच्या रूपानें व मार्शल-योजनेनुसार १७० कोटी पौंड इतकी मदत मिळाली व म्हणूनच ही गंगाजळी अद्याप टिकून राहिली. याच प्रमाणांत यापुढेंही अशा प्रकारची मदत मिळणें शक्य दिसत नव्हतें. म्हणून आपली डॉलर्सची तूट कमी करण्यासाठीं पौंडी गटांतील राष्ट्रांनीं आपली डॉलर्सची गरज शेंकडा २५ नें कमी करण्याचा निश्चय केला. तरीसुद्धां चालू वर्षाच्या अखेर या गंगाजळीची पातळी अनिष्ट थरापर्यंत जाण्याची भीति होती. ही डॉलर—अडचण भागविण्याचा एक मार्ग म्हणजे डॉलर-मालाच्या गरजा कमी करणें व डॉलर-गटांतील राष्ट्रांना स्टर्लिंग क्षेत्रांतून जास्तींत जास्त माल निर्यात करणें. हा मार्ग दुस्तरच होता; कारण स्टर्लिंग राष्ट्रांतील वस्तूंचे भाव अमेरिकन मालाच्या किंमतींपेक्षां बरेच वर होते. त्यामुळेंच अमेरिकन मालास मागणी अधिक व स्टर्लिंग मालाचा अमेरिकेंतील खप कमी अशी परिस्थिति उद्भवली होती. शिवाय

अमेरिकेहून येणाऱ्या वस्तू– गहू, कापूस, तंबाखू व पेट्रोल– ब्रिटिश अर्थव्यवस्थेला इतक्या मूलभूत स्वरूपाच्या आहेत कीं त्यांच्या मागणींत२५ टक्क्यांहून अधिक कपात करणें ब्रिटनलाहि दुरापास्त होतें. या कोंडींतून बाहेर पडण्यासाठीं ब्रिटिश मालाच्या किंमती उतरविल्या पाहिजेत. तसें करावयाचें म्हणजे उत्पादनखर्चांत कपात केली पाहिजे. त्यासाठीं मजुरींचे दर कमी केले पाहिजे. व वेळ पडल्यास मजुरांस कामावरून दूर करून बेकारीशीं सामना केला पाहिजे. हा खडतर मार्ग अवलंबणें इंग्लंडचे मजूर सरकारास पार्लमेंटनिवडणुका इतक्या जवळ आल्या असतांना तरी अशक्यच होतें. उत्पादनखर्च कमी करण्याचा दुसरा मार्ग म्हणजे उत्पादनक्षमता वाढविणें हा होय. अमेरिकेशीं तुलना करतां ब्रिटिश उद्योगधंद्यांची उत्पादनक्षमता कमीच वाटते. उत्पादनास यांत्रिक साहाय्य अमेरिकेंत जितक्या जोराचें मिळतें तितकें इतरत्र मिळत नाहीं. त्यामुळें अमेरिकन मालाचे दर इतर मालापेक्षां कमी असतात. ब्रिटनला आपला उत्पादनखर्च कमी करून अमेरिकन मालाशीं टक्कर देणें जरूर वाटलें तरी ताबडतोब शक्य नव्हतें. राहतां राहिला एकच मार्ग व तो म्हणजे पौंडाचें अवमूल्यन. पौंडाची किंमत कमी करून ब्रिटनची निर्यात वाढविणें शक्य होतें. एक पौंड किंमतीच्या ब्रिटिश वस्तूसाठीं ४·०३ डॉलर्सऐवजीं जर २·८० डॉलर्स अमेरिकेस द्यावे लागले तर त्या मानानें ब्रिटिश वस्तु अमेरिकेंत स्वस्त होतील व त्यांचा खप वाढेल. ब्रिटिश मालाच्या डॉलरक्षेत्रांतील किंमती अवमूल्यनद्वारां उतरवून आवश्यक अशा अमेरिकन मालाची आयात टिकविण्याइतके डॉलर्स आपणांस मिळवितां येतील अशा हेतूनेंच ब्रिटननें पौंडाची बहिर्गत किंमत कमी करण्याचा निर्णय घेतला.

## अवमूल्यनाचे इंग्लंडवर परिणाम

पौंडाची किंमत कमी केल्यामुळें इंग्लंडच्या आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील इभ्रतीस धोका आला आहे असें कांहींचें मत पडतें. वस्तुतः गेल्या महायुद्धापूर्वी ब्रिटन ही जगाची बाजारपेठ होती. लंडन हें जागतिक व्यापाराचें केंद्र होतें व विशेषतः जगांतील आर्थिक व्यवहाराचीं सूत्रें लंडनमधूनच हालवलीं जात असत. महायुद्धाचा परिणाम म्हणून इंग्लंडला बरेंच आर्थिक नुकसान सोसावें लागलें व मदतीसाठीं अमेरिकेकडे याचना करावी लागली. त्याच वेळीं वास्तविक पहातां जगाच्या दृष्टीनें पौंडाची किंमत कमी झाली होती. अवमूल्यनानें या घटनेस मूर्त स्वरूप दिलें इतकेंच. जगांतील इतर राष्ट्रें आपले डोळे लंडनकडे न लावतां वॉशिंग्टनकडे फिरवितात याचें कारण अमेरिकेचें आर्थिक वर्चस्व आज निर्विवाद आहे हें होय.

पौंडाची किंमत कमी केल्यानें ब्रिटनला आयात-निर्यातीची तोंडमिळवणी करण्यास मदत होईल. एकतर ब्रिटिश माल डॉलरपेठांतून अमेरिकन मालापेक्षां स्वस्त पडेल व त्यामुळें त्याचा खप वाढेल. शिवाय अमेरिकन माल ब्रिटनला पूर्वीपेक्षां जास्त महाग पडेल व त्यामुळें त्याची आयात कमी प्रमाणावर होईल. ही संधि साधून ब्रिटनला आपले उद्योगधंदे अधिक कार्यक्षम करून आपला उत्पादनखर्च कमी करण्यास वाव मिळेल. अर्थात् हे फायदे सत्यसृष्टींत कोणत्या स्वरूपांत व कितपत ब्रिटनला मिळतील हें आजच सांगतां येण्यासारखें नाहीं. ब्रिटनची अमेरिकन मालाची मागणी कमी न झाल्यास ब्रिटनला डॉलर्सची गरज अधिकच भासेल. अमेरिकन कच्चा माल महाग झाल्यामुळें ब्रिटनचा उत्पादनखर्चही वाढण्याचा संभव आहे. शिवाय स्वस्त व चांगला माल अमेरिकेंतील बाजारपेठांत गेला तरी त्याचा खप कितपत होईल ? त्याच्या विक्रीपासून डॉलर्सची मिळकत कितीशी होईल ? १०० पौंडांचा माल खपवून पूर्वी ४०३ डॉलर्स मिळत. परंतु यापुढें फक्त २८० डॉलर्सच मिळणार. म्हणून पूर्वीइतकेंच डॉलर्स मिळविण्यासाठीं ब्रिटिश माल तितक्या प्रमाणावर अधिक खपला पाहिजे व पूर्वीपेक्षां जास्त डॉलर्स मिळवायचे झाले तर कितीतरी अधिक प्रमाणावर ब्रिटनला आपला माल अमेरिकेंत खपवितां आला पाहिजे. असें करण्याचा प्रयत्न ब्रिटन करीत असतांना अमेरिका काय स्वस्थ बसणार आहे ? अमेरिकन उद्योगपती आपल्या धंद्यांची कार्यक्षमता वाढवून अमेरिकन मालाचा खप टिकविण्यासाठीं व वाढ-





अनुक्रमणिका

विण्यासाठीं प्रयत्न करणार नाहींत काय ? तसें त्यांनीं केल्यास ब्रिटनला आपलें उद्दिष्ट साधण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा करावी लागेल यांत शंका नाहीं.

### अवमूल्यनाचे अमेरिकेवर परिणाम

सध्याचें पौंडाचें अवमूल्यन अमेरिकेच्या सल्ल्यानें करण्यांत आलें आहे. या अवमूल्यनापासून ब्रिटनला काय फायदे संभवतात हें वर दर्शविलें. परंतु प्रश्न असा उद्‌भवतो कीं, स्टर्लिंग क्षेत्रांतील राष्ट्रांना आपला माल अमेरिकेंत अधिक खपविण्यास मदत करणाऱ्या या अवमूल्यनास अमेरिकेनें कां संमति द्यावी ? अमेरिकेचा दृष्टिकोन या बाबतींत जरा वेगळा आहे. अमेरिकेस आंतरराष्ट्रीय व्यापाराची वाढ व भरभराट होणें फार श्रेयस्कर वाटतें. गेले कांहीं महिने अमेरिकन किंमती खालीं घसरत आहेत व त्यामुळें मंदीचीं चिन्हें डोकावूं पहात आहेत. ही मंदी टाळण्याकरितां कुंठित झालेल्या आंतरराष्ट्रीय व्यापाराला मुक्तद्वार करून देणें व चलनांचें आपसांतील परिवर्त्यत्व (convertibility) संकुचित न ठेवतां खुलें करणें हें अमेरिकेच्या दृष्टीनें जरूर आहे. आंतरराष्ट्रीय व्यापाराची वाढ होण्यासाठीं हुंडणावळीचे दर योग्य असावे लागतात. त्या दरांमध्यें राष्ट्राच्या आर्थिक परिस्थितीचीं खरीं प्रतिबिंबें दिसावयास पाहिजेत. हें उद्दिष्ट साध्य करण्याचें एक साधन या दृष्टीनें अवमूल्यनाकडे पहाणें उचित आहे. तेव्हां त्याला अमेरिकेची संमतीच काय पण पाठिंबा असणें ही गोष्ट नवलाची नाहीं. अवमूल्यन केल्यानें इतर राष्ट्रांना अमेरिकन डॉलर्स मिळविणें सुकर होईल व त्यामुळें अमेरिकन मालास मागणी राहील. इतर राष्ट्रांची विस्कळित आर्थिक घडी नीटपणें घालून देण्यास अमेरिका मदत करते. ती येवढ्याचसाठीं कीं त्यायोगें अमेरिकेंतील मंदीचें वातावरण नाहींसें होऊन अमेरिकेची आर्थिक प्रगति व वर्चस्व कायम रहातील. याशिवाय अमेरिकन भांडवल गुंतविण्यास पुरेसें क्षेत्र मिळविण्याचा हेतु सुद्धां अमेरिकेच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. हें भांडवल इतरत्र गुंतविल्याशिवाय अमेरिकेस गत्यंतर नाहीं. अमेरिकन भांडवल परराष्ट्रांत गुंतविल्यानंतर जर त्या राष्ट्रांनीं आपआपल्या चलनांचें अवमूल्यन केलें तर अमेरिकन भांडवलदारांचा त्यामुळें तोटा होईल. तेव्हां अवमूल्यनाचा हा प्रश्न धसाला लावून त्या बाबतींत इतर राष्ट्रांनीं निश्चित स्वरूपाचे निर्णय घेतल्याशिवाय अमेरिकन भांडवल इतरत्र गुंतविणें म्हणजे धोक्याचेंच होतें. अवमूल्यन एकदांचें सत्यसृष्टींत उतरल्यानंतर अमेरिकन भांडवलाचा मार्ग खुला होऊं शकतो—निदान त्या बाबतींतील अनिश्चितता दूर झाल्यामुळें अमेरिकन भांडवलदारांना आपला मार्ग आंखणें पुष्कळच सोपें होतें. या कारणामुळें अवमूल्यनास संमति देण्यास हरकत नाहीं असें अमेरिकेला वाटलें असावें. बाहेरचा माल आपल्या मालाशीं डॉलरपेठांतून टक्कर देईल खरा; पण आपली कार्यक्षमता वाढवून आपण बाहेरील मालाशीं चढाओढ करूं शकूं असा आत्मविश्वास अमेरिकेस वाटत असला तर त्यांत वावगें काय आहे?

### रुपयाचें अवमूल्यन

पौंडाचे अवमूल्यनामुळें उद्‌भवलेल्या परिस्थितींत रुपयाचें काय करावयाचें हा प्रश्न साहजिकच हिंदुस्थानसरकारपुढें उभा राहिला. पौंड व रुपया यांचे परस्परसंबंध फार निकटचे होते. १ रुपया म्हणजे १८ पेन्स हा हुंडणावळीचा दर कायम ठेवण्याचें धोरण आज कित्येक वर्षें हिंदुस्थान सरकारनें चालविलेलें आहे. पौंडाच्या डॉलर-किंमतींत फरक झाल्याबरोबर रुपयाची डॉलर-किंमत पूर्वी होती तीच ठेवावयाची कीं तिचे मध्यें कपात करावयाची हा प्रश्न होता. रुपया-पौंड यांचे पूर्वापार संबंध अबाधित ठेवावयाचे म्हटलें तर रुपयाची डॉलर-किंमत पौंडाचे अवमूल्यनाचे प्रमाणांतच कमी करणें भाग होतें. व तसें करण्याचेंच हिंदुस्थान सरकारनें ठरविलें. १ रुपया म्हणजे ३०·२२५ अमेरिकन सेंट हें पूर्वीचें प्रमाण बदलून १ रु. म्हणजे २१ सेंट हा नवीन दर आतां अमलांत आला आहे. हिंदुस्थान व अमेरिका यांचा जो व्यापार आहे त्यांतील अडचणींमुळें अवमूल्यन करावें लागत नसून इतर स्टर्लिंगक्षेत्रांतील राष्ट्रांनीं आप-आपल्या चलनांचें अवमूल्यन केल्यामुळें रुपयाचें डॉलरमूल्य कमी करणें आम्हांस भाग पडलें आहे, असा खुलासा

# पौंड व रुपया यांचें अवमूल्यन

सरकारी अर्थखात्याच्या २० सप्टेंबरचे प्रसिद्धि-पत्रकांत करण्यांत आला. हिंदुस्थानचा बराचसा व्यापार स्टर्लिंग-गटांतील राष्ट्रांशीं आहे, या राष्ट्रांनीं आपल्या चलनाचें मूल्य कमी केल्यानंतरही रुपयाचें मूल्य पूर्वीइतकेंच ठेविलें असतें तर स्टर्लिंग गटांतील राष्ट्रांशीं जो हिंदुस्थानचा व्यापार चालतो त्याचेवर हिंदुस्थानचे दृष्टया अनिष्ट परिणाम झाले असते. ते टाळण्यासाठीं रुपयाचें अवमूल्यन जरूर होतें.

## अवमूल्यनाचे हिंदुस्थानवर परिणाम

रुपयाचें अवमूल्यन केल्यानें हिंदुस्थानचा माल डॉलरक्षेत्रांत स्वस्त होऊन त्याचा खप वाढावा; उलटपक्षीं अमेरिकन माल महाग होऊन त्याची आयात कमी प्रमाणावर व्हावी. आजचें अवमूल्यन नियंत्रणाचे वातावरणांत अवतरलें असल्यामुळें त्याचे परिणाम नियंत्रणाचे धोरणावर बहुतांशीं अवलंबून राहतील. अमेरिकन माल महाग झाला तरी तो हिंदुस्थानांत येणारच नाहीं असें सांगतां येत नाहीं. उलटपक्षीं, अमेरिकन मालाची आयात कमीच करावयाची म्हटली तर सरकारला आयात व्यापारावरील नियंत्रणानें तसें करतां येणें शक्य आहे. मुख्यत्वेंकरून अमेरिकेहून धान्याचा भरपूर सांठा गेलीं कांहीं वर्षें हिंदुस्थानांत येत आहे. चालू सालांत डॉलर-देशांतून यापुढें धान्याची आयात केली जाणार नाहीं असें सरकारनें जाहीर केलेंच आहे. १९५१ पासून धान्याचे बाबतींत हिंदुस्थानला स्वयंपूर्ण बनविण्याचें सरकारचें धोरणही प्रख्यातच आहे. अर्थात् १९५० सालीं लागणारें अमेरिकेचें धान्य हिंदुस्थानला महाग पडेल यांत शंका नाहीं. याशिवाय आंतरराष्ट्रीय चलननिधि (I. M. F.) व जागतिक बँक (World Bank) यांचेकडून घेतलेलें डॉलरकर्ज फेडतांना व त्यांचेवरील व्याज देतांना रुपयाच्या अवमूल्यनामुळें आपणास जास्त रुपये खर्चीं घालावे लागतील. त्याचप्रमाणें जे पौंड आपणांस डॉलरमध्यें परिवर्तन करण्यासाठीं मिळतात (convertible sterling), त्यांचीही किंमत कमी झाल्यामुळें आपला त्या बाबतींत तोटाच आहे.

रुपयाच्या अवमूल्यनामुळें आपला माल डॉलर-राष्ट्रांत कितपत जास्त खपेल ? आपले निर्यातीचे पदार्थ अशा प्रकारचे आहेत कीं, त्यांच्या किंमती कमी झाल्यामुळें त्यांचा खप विशेष वाढेल अशी आशा करण्यास फारशी जागा नाहीं. ज्यूट (कच्चा व पक्का) हाच मुख्यत्वें आपला डॉलर-मिळवता आहे. १९४८ सालीं हिंदुस्थानला मिळालेले डॉलर व इतर दुर्लभ चलन यांची किंमत जवळजवळ १२२ कोटी रुपये होती. त्यापैकीं ज्यूट-निर्यातीचा वांटा ७६ कोटी रुपयांचे वर होता. आतां पाकिस्तानें आपल्या रुपयांचें डॉलरमूल्य पूर्वींइतकेंच कायम ठेवल्यामुळें पाकिस्तानचा ज्यूट हिंदुस्थानच्या गिरण्यांना महाग पडेल व या वाढत्या उत्पादन-खर्चामुळें अवमूल्यनापासून होणाऱ्या फायद्याचें कांहीं अंशीं निर्मूलन होईल. जरी थोडाबहुत आधिक ज्यूट-माल अमेरिकेंत खपला तरी त्याचेपासून पूर्वीपेक्षां फारसे जास्त डॉलर्स मिळण्याचा संभव कमीच आहे. अवमूल्यनामुळें चहा, मँगॅनीझ व कापूस यांचा डॉलरक्षेत्रांत पूर्वींहून अधिक खप होण्याची शक्यता फारच कमी आहे. लाख, काजू, अभ्रक, मसाल्याचे जिन्नस, तेलें व कातडीं यांची निर्यात वाढेल खरी; परंतु सर्व पदार्थांवरील परिणाम ध्यानांत घेतां अधिक डॉलर्स मिळविण्याची आपल्या निर्यात मालाची शक्ति फारच बेताची आहे असें म्हणावें लागतें.

## अवमूल्यन व जीवनमान

रुपयाच्या अवमूल्यनामुळें जीवनमान (cost of living) प्रत्यक्षरीत्या वाढण्याचें कांहीं कारण नाहीं. अमेरिकेहून येणारा माल यापुढें जास्त महाग झाला तरी धान्याखेरिज इतर अमेरिकन मालाचा समावेश सामान्य जनतेच्या राहणीखर्चांत विशेष प्रमाणावर होत नाहीं. धान्याच्या बाबतींत तर आपण स्वयंपूर्ण होण्याचे प्रयत्न करीतच आहोंत. असें असलें तरी अवमूल्यनाचा परिणाम किंमतींचा स्तर (price level) वाढण्याकडे होणें साहाजिकच आहे. एकतर अवमूल्यनानें देशाची निर्यात वाढून आयात कमी होते म्हणजे देशांतील वस्तूंचा पुरवठा कमी होण्याकडे अवमूल्यनाची प्रवृत्ति असते. तसें झाल्यास व देशांतील उत्पादन पुरेसें न वाढल्यास किंमतींचें प्रमाण वाढणारच. अमेरिकेहून व पाकिस्तानहून येणारा माल तर हिंदुस्थानला महाग पडेलच. परंतु

इतर स्टर्लिंग राष्ट्रांची अमेरिकेला निर्यात वाढल्यास त्यांच्याकडून हिंदुस्थानांत येणारा मालही महाग होण्याचा संभव आहे. या वाढत्या किंमतींचा अनिष्ट परिणाम जीवनमानावर होणारच नाहीं असें खात्रीपूर्वक सांगणें धाडसाचें आहे. निदान तसा परिणाम होऊं न देण्याचे प्रयत्न केले नाहींत तर हिंदुस्थानांतील आर्थिक पेंचप्रसंग अधिक बिकट मात्र होईल.

### पाकिस्तानचा निर्णय व त्याचे परिणाम

आजपावेतों हिंदुस्थान व पाकिस्तान यांच्या चलनांचें मूल्य सारखेंच असे. २० सप्टेंबर १९४९ रोजीं पाकिस्ताननें आपल्या चलनाचें डॉलरमूल्य कायम राखण्याचा निर्णय घेतला. हिंदी रुपयाचें मूल्य कमी झालें तरी पाकिस्तानी रुपया आपल्या उच्च पदावरून खालीं उतरला नाहीं असें पाकिस्तानला आज अभिमानानें सांगतां येतें या निर्णयामुळें स्टर्लिंगक्षेत्रांतील इतर राष्ट्रांना पाकिस्तानी माल महाग पडेल. असें झालें तरी पाकिस्तानांतील ज्यूट व कापूस यांची निर्यात फारशी कमी होणार नाहीं असा कयास पाकिस्ताननें बांधला असावा. हिंदुस्थानला पाकिस्तानच्या ज्यूटखेरीज आपली गरज भागवितां येणार नाहीं. पाकिस्तानच्या कापसाच्याहि चारपांच लाख गांठी दरवर्षीं हिंदुस्थानांत खपतात. पाकिस्तानचा कापूस आतां महाग झाल्यामुळें हिंदुस्थान आपली गरज ईजिप्त व पूर्व आफ्रिका येथील कापसानें भागविण्याचा प्रयत्न साहजिकच करील. अमेरिकन माल पाकिस्तानला पूर्वीचेच किंमतीनें मिळूं शकेल. हिंदुस्थानचा माल पाकिस्तानला पूर्वीपेक्षां स्वस्त पडेल व त्यामुळें पाकिस्तानचें राहणीचें मान कमी होण्यास मदत होईल. बाहेरील माल जास्त प्रमाणावर आल्यामुळें आपल्या उद्योगधंद्यांवर त्याचा विपरीत परिणाम होईल ही भीति पाकिस्तानला बाळगण्याचें कारण नाहीं. कारण अद्याप पाकिस्तानांत उद्योगधंदे मोठ्या प्रमाणांत प्रस्थापितच झाले नाहींत. आजच्या परिस्थितींत अवमूल्यन न केल्यापासून पाकिस्तानला जे तात्कालिक स्वरूपाचे फायदे आहेत ते लक्षांत घेतां पाकिस्तानच्या दृष्टीनें अवमूल्यन न करण्याचा निश्चय हा चुकीचा आहे असें म्हणतां येत नाहीं. आज नाहीं, तरी कांहीं काळानंतर पाकिस्तानला आपल्या रुपयाचें अवमूल्यन करावेंच लागेल असा अभिप्राय लंडन, वॉशिंग्टन व अन्य ठिकाणींहि व्यक्त केला जात आहे. परंतु पाकिस्ताननें हा निर्णय हेतुपुरःसर घेतला आहे व म्हणून पाकिस्तानी रुपयाचें मूल्य कमी करण्याचें कारण नाहीं, असा खुलासा पाकिस्तानच्या अधिकारी गोटातर्फे करण्यांत आला आहे. कांहीं झालें तरी पाकिस्तानच्या या निर्णयामुळें हिंदुस्थानपुढें आणखी एक नवीन बिकट प्रश्न उपस्थित झाला आहे येवढें खरें.

---

## उदार मन आणि विवेकयुक्त बुद्धि

आज आपण सर्व जणांनीं उदार मनानें आणि शहाणपणानें विचार केला पाहिजे. आपणांस नवीन समाजरचना बनवावयाची आहे. आज आपण गरीब आहोंतच; पण म्हणून आपण अविवेकी असतां कामा नये. आपली आर्थिक स्थिति आपण सुधारत आहोंत, त्याबरोबर आपलीं मनें देखील आपण सुधारलीं पाहिजेत. धूर्त लोकांकडून आपण 'बनविलें' जातां कामा नये. श्रीमंत लोक आपणांस 'बनवून' आपली पिळणूक करतात हें वाईट तर खरेंच; पण शासनसंस्था मोडायची इच्छा करणारे धूर्त बुद्धिमान् लोक आपणांस 'बनवून' आपली बौद्धिक पिळणूक करतात, तीहि तितकीच निंद्य आहे!

—श्री. च. राजगोपालाचार्य

विजयादशमीच्या 'नभोवाणी'वरील संदेशामधून
१।१०।४९








प्रा. य. का. सोहनी

# मोलिएरच्या नाटकांतील डॉक्टर-पात्रें

सर्व देशांत व सर्व कालांत कांहीं विवक्षित धंदे व व्यवसाय, लोकांच्या कुचेष्टेचा विषय झाल्याचें आपण पहातों. नाटकें, कादंबऱ्या व चित्रपट यांतून वरील व्यवसायांतील लोकांचीं पात्रें भडक रंगांत रेखाटून तीं उपहासाचा विषय बनविल्याचें आपल्या दृष्टीस पडतें. 'हाच मुलाचा बाप' या नाटकांतील वधूपरीक्षेस आलेल्या गुरांच्या डॉक्टरचें पात्र पहा. त्याची चालण्याची ढब, त्याचे टिपून आणलेले आचरट प्रश्न व त्याचा एकंदर वेष या सर्वांमुळें प्रेक्षकांत हास्याच्या लाटा उमटतात. वेळप्रसंग न ओळखतां हव्या त्यावेळीं वाटेल त्या विषयावर काव्य भरकटणाऱ्या कवींचें अत्र्यांनीं रंगविलेलें चित्र याच वर्गांत मोडतें. याहून गमतीदार म्हणजे गडकऱ्यांनीं 'एकच प्याला' नाटकांत दाखविलेला वैद्य व त्याचा प्रतिस्पर्धी डॉक्टर! एकजण रोगी तापानें फणफणत आहे असें म्हणतो तर दुसरा त्याचें शरीर गार पडत चालल्याची ग्वाही देतो. कांहीं ठिकाणीं वकील सुद्धां थट्टेचा विषय होऊन बसल्याचें आपण पहातों. मोलिएर (Moliere)नें मात्र डॉक्टरचेंच पात्र जास्त वेळां रंगविल्याचें आढळून येतें. वकील हा पैशाच्या देवाणघेवाणीसंबंधीं व क्वचित् प्रसंगीं अब्रूनुकसानीचे दावे लढवितो. तेव्हां खटल्याचा निकाल विरुद्ध लागल्यास आशिलाला आर्थिक झळच सोसावी लागते. उलटपक्षीं डॉक्टर हा रोग्याच्या जीविताशीं खेळ खेळत असल्यामुळें त्याच्या हलगर्जीपणानें बिचाऱ्याला प्राणास मुकावें लागतें! एकंदरींत वकीलाच्या तावडींतील अशील व डॉक्टरच्या हातांतील रोगी या दोघांची फार केविलवाणी स्थिति असते.

मोलिएरनें याच दृष्टीनें डॉक्टरचें पात्र अधिक वेळां आपल्या नाटकांतून रंगविल्याचें आढळून येतें. शिवाय, बुवाबाजी, ढोंग व दांभिकपणा यावर मोलिएर हा नेहमींच तुटून पडत असे. हे दोष जेथें दिसून येतील तेथें कोणाची पर्वा न बाळगतां तो धडाडीनें हल्ला करी. विज्ञान व वाङ्मय यांच्या मागें अतिशय लागून ज्या स्त्रियांनीं आपल्या संसारांतील नेहमींचीं कर्तव्यें पार पाडण्यांत कुचराई केली, अशा विद्वत्तेचा टेंभा मिरविणाऱ्या बायकांवर त्यानें आपल्या (Les Femmes Savantes) 'विद्वान् स्त्रिया' या नाटकांत झोड उठविली. धर्माच्या नांवाखालीं साध्यासुध्या धर्मभोळ्या माणसांना लुबाडणाऱ्या समाजांतील 'ढोंगी साधूला' त्यानें उजेडांत आणलें (Tartuffe).

तथापि डॉक्टरवर मोलिएरनें अधिक जोराचे हल्ले चढविले, आणि याचें एक महत्त्वाचें कारण म्हणजे १७ व्या शतकांतील फ्रान्समध्यें झालेली वैद्यकीय शास्त्राची शोचनीय स्थिति. एकंदर डॉक्टर शंभराहून अधिक नव्हते व या सर्वांनीं अशी एक बळकट संघटना निर्माण केली होती कीं गरीब होतकरू तरुण डॉक्टरास तींत शिरकाव मिळणें दूरापास्त होतें! हे सर्वजण जुन्या जमान्याला अट्टहासानें चिकटून राहणारे होते. वैद्यकीय शास्त्र हें पूर्णतेला पोंचलें आहे अशी त्यांची दृढ समजूत होती. म्हणून नवे नवे शोध व उपकरणें ते मानीत नसत. पूर्वजांनीं ठरवून दिलेली रोगांची यादी, त्यांनीं घालून दिलेली रोगनिदानपद्धति व त्यांवर सुचविलेले उपचार यांच्या पलीकडे ते जात नसत. शस्त्रक्रिया त्यांना मान्य नव्हती. इतकेंच नव्हे तर शस्त्रक्रिया करणाऱ्या डॉक्टरला ते कमी लेखीत. रुधिरा-





अनुक्रमणिका

भिसरणाचें तत्त्व इंग्लंडमध्यें प्रथम सिद्ध झाल्यामुळें तें त्यांना अमान्य होतें. रेचक व तुंबड्या लावून रक्त काढणें हे दोन उपाय त्यांना बहुतेक रोगांवर रामबाण वाटत; कित्येक वेळां रोगप्रतिबंधक उपाय म्हणून सुद्धां ते वरील दोन उपचारांचाच अवलंब करीत. मोलिएरवरील एका ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें, "या डॉक्टरांनीं आपल्या या अघोरी उपचारांनीं १४ व्या लुई राजाची खडखडीत प्रकृति ढांसळून दाखविली व त्याला ७२ व्या वर्षी यमसदनास पाठविलें."

मोलिएरची स्वतःची प्रकृति यथातथाच होती; त्याला खोकल्याचा विकार जडला होता. त्यामुळें तो डॉक्टरांचा सल्ला घेऊन त्यांनीं लिहून दिलेलीं औषधें घेत असे. परंतु या उपचारांचा त्याच्या आजारावर कांहींच परिणाम न होता उलट दिवसें-दिवस त्याचा रोग बळावत चालला.

एकदां चौदाव्या लुईनें त्याला सहज विचारलें: "काय मोलिएर, डॉक्टरांचें व तुझें कसें काय जमतें ?"

"ते औषधं लिहून देतात; मी तीं कधींच घेत नाहीं व माझी प्रकृति ठीक आहे !" असें मिस्किल उत्तर त्यानें दिलें. अर्थात् त्याच्या मरणानंतर जें डॉक्टरचें बिल झालें त्यावरून तरी असें दिसतें कीं त्यानें औषधें घेतलीं असावींत अगर मोरींत तरी ओतून टाकलीं असावींत !

डॉक्टर पहातांच त्याला इतका तिरस्कार वाटे कीं एका ठिकाणीं त्यानें लोकांना खालील सूचना दिलेली आढळते :

"रस्त्यानें डोळे नीट उघडे ठेऊन जात जा. नाहींतर रोग्याच्या शोधांत असलेला एखादा डॉक्टर तुम्हांला खास गांठील !"

त्याच्या एका डॉक्टर-स्नेह्याच्या मुलाला चर्च-मधील धर्मगुरूची जागा हवी होती. त्याला राजा-कडे देण्यासाठीं लिहिलेल्या शिफारसपत्रांत त्यानें लिहिलें :

"...या तरुणाच्या बापानें आपला रोगी तीन वर्षें जिवंत ठेवण्याची हमी घेतली आहे. पण माझें म्हणणें असें कीं यानें रोग्याला न मारण्याचें वचन दिलें तरी पुरे...!"

डॉक्टरांवरील आपला पहिला हल्ला मोलिएरनें Don Juan या नाटकांत चढविला. Don Juan चा नोकर Sqnaralle हा वेषांतर करण्याकरितां म्हणून वैद्याचा लांब काळा झगा चढवितो. त्याचा हा वेष पाहून त्याचा धनी Don Juan हा डॉक्टरच्या पेशाची खूप अवहेलना करतो. परंतु वरील नाटकांतील टीका ही बरीच सौम्य स्वरूपाची होती. त्या काळांतल्या खऱ्याखुऱ्या डॉक्टरचें चित्र त्यानें अजून रेखाटलें नव्हतें.

ही उणीव पूर्णपणें भरून काढण्यासाठींच कीं काय, त्यानें Amour Me'decin ("प्रियकर डॉक्टर") या नाटकांत एक सोडून चार डॉक्टर रंगभूमीवर आणले. हे चौघे रोग्याला इतका वेळ तपासतात कीं आपण लवकर राम म्हटलें तर बरें असेंच त्या बिचाऱ्याला वाटावें ! व सर्वांत मौज म्हणजे तपा-सणी झाल्यावर प्रत्येकाचें रोगनिदान व उपचार हे इतके भिन्न असतात कीं त्यांच्यांत बाचाबाचीला सुरुवात होऊन तिचें रूपांतर लठ्ठालठ्ठींत होतें. शेवटीं या चौघांना हाकलून देऊन आजारी मुलीचा बाप नवीन डॉक्टर हुडकण्यासाठीं निघतो. सुदैवानें एक तरुण डॉक्टर दारापाशीं उभा असलेला त्याला आढळतो. अर्थात् त्या बिचाऱ्या बापाला माहीत नसते कीं हा आपल्या मुलीचा प्रियकर वेषांतर करून आला आहे. मुलगी नवीन डॉक्टरच्या औषधोपचारानें बरी होते हें सांगण्याची जरूरी नाहीं; कारण तिला झालेला प्रेमरोग बरा करणारा तज्ज्ञ तिला भेटतो.

याच नाटकांत लिझेल ही दासी खालील हकीगत सांगतांना आढळते :

"कशाला हवा वैद्य ! परवां माझं आवडतं मांजर दुसऱ्या मजल्यावरून खालीं पडलं; त्याचा पाय मुरगळला असावा. पण कांहीं नाहीं, बिचारं अन्नपाणी न घेतां गुपचूप कोपऱ्यांत पडून राहिलं ! आणि आश्चर्याची गोष्ट कीं चौथ्या दिवशीं तें खड-खडीत बरं झालं. नशीब त्याचं कीं मांजरांत डॉक्टर नाहींत, नाहीं तर त्यांच्या उपचारानं खात्रीनं तें मेलं असतं !"

M. de Pourceaugnac "गांवढळ जहागीर-दार" या नाटकांत, एक अजागळ जहागीरदार

[illegible]साठीं आपल्या वधूच्या गांवीं येतात. बापानें [illegible]विलेला वरील वर मुलीला पसंत नसतो. तिचें [illegible] दुसऱ्याच एका तरुणावर असतें. वडिलांची [illegible] मोडल्यास ते फार रागावतील व घराबाहेर [illegible]लून देतील अशी साधार भीति तिला वाटते. [illegible] तिच्या प्रियकराचा हिकमती नोकर एक नामी [illegible] योजतो. दोन डॉक्टरांना बोलावून त्यांच्या-[illegible]न तो जहागीरदार वेडा असल्याचें वदवून घेतो. [illegible]टरांनीं दिलेला हा निर्णय प्रमाण मानून मुलीचा बाप लग्न मोडतो.

Le Me'decin Malgre lui " मारून मुट-[illegible]न वैद्यबुवा " हें नाटक तर सर्वांना परिचित आहेच. आपला नवरा दररोज आपणांस मारतो याचा सूड उगविण्यासाठीं, एक बाई वैद्याच्या [illegible] असलेल्या एका सरदाराच्या दोघां जासू-[illegible]ना आपले यजमान एक नामांकित वैद्य अस-ल्याचें सांगते. मात्र मार दिल्याशिवाय ते तशी कबुली देणार नाहींत असेंहि सांगण्यास ती चुकत नाहीं. शेवटीं आणखी मार चुकविण्यासाठीं तिचा नवरा आपण वैद्य असल्याची नाइलाजानें कबुली देतो. तो आजारी मुलीला तपासण्यासाठीं जातांना त्याला त्या मुलीचा प्रियकर भेटतो. त्याच्याकडून आपल्या रोग्याचा खरा रोग त्याला समजून येतो. आपल्या अगडबंब शब्दांतील बडबडीमुळें तो मुलीच्या बापावर इतकी छाप पाडतो कीं हा नामांकित वैद्य असल्याची त्या भोळसट पित्याची खात्री होते. शेवटीं आपला सहकारी म्हणून हा डॉक्टर मुलीच्या प्रियकराला वेषांतर करून आणतो. [illegible]वेळीं ही संधि साधून प्रियकर मुलीला पळवितो. मुलीचा बाप डॉक्टरवर अतिशय संतप्त होतो. परंतु [illegible] नवीन जोडप्याच्या आगमनानें समेट घडून [illegible].

Le Malade Imaginaire या नाटकांतील [illegible] व्यक्तीला आपण आजारी आहोंत असें [illegible] असतें. परंतु डॉक्टरला पैसे द्यावे लागू [illegible] म्हणून तो आपल्या मुलीकरतां एक मध्यम-[illegible] डॉक्टर नवरा शोधतो. मुलीचें प्रेम मात्र [illegible] एका तरुणावर असतें व ती त्याच्या-बरोबर [illegible] जाते. शेवटीं नाइलाजानें बापाला दुसरा डॉक्टर स्वतःच्या शुश्रूषेसाठीं बोलवावा लागतो. या डॉक्टरची व रोग्याची मुलाखत मोलि-एरनें इतक्या गमतीची रंगविली आहे कीं पदवी-परीक्षेच्या उमेदवाराला ज्याप्रमाणें आपल्या परीक्षका-च्या हास्यास्पद प्रश्नांना उत्तरें द्यावीं लागतात तशीच स्थिति या नवीन डॉक्टरची होते !

मोलिएरच्या पूर्वीच्या कांहीं नाटककारांनीं डॉक्टरचें पात्र रंगभूमीवर आणलें होतें. परंतु तें इतक्या ठोबळ रीतीनें रेखाटलेलें होतें कीं त्यामुळें जो विनोद निर्माण होई तो केवळ तात्पुरत्या स्वरूपाचा होता. शिवाय तो फार करून विनोदी प्रसंगांच्या गुंतागुंतीवर अवलंबून असे. मोलिएरनें मात्र वैद्यशास्त्रांतील विवक्षित शब्द, डॉक्टराच्या खोडी व हावभाव यांचा सूक्ष्म अभ्यास व निरीक्षण करून डॉक्टरचें पात्र हें स्पष्ट रेखांनीं चितारलें.

गंभीर विनोद कोणत्या मार्गानें निर्माण करतां येईल यावर मोलिएरचा विशेष कटाक्ष असे. त्याचा उच्च विनोद हा प्रसंगाच्या मिश्रणापेक्षां व्यक्तीच्या मूलभूत गुणदोषांवर आधारलेला असे. नाटकाच्या सुरुवातीस जी व्यक्ति उपहासास पात्र ठरवा-वयाची असेल तिची माहिती तो इतर पात्रांच्या संभाषणांतून प्रेक्षकांना देई. ती माहिती इतक्या अल्प शब्दांत पण पुरेशी असे, कीं त्यामुळें ज्या व्यक्तीवर मोलिएरचा सर्व रोख असे, ती प्रेक्षकापुढें येतांच त्यांना हसूं लोटावें ! शिवाय इतर पात्रांचें तीविषयीं मत, तिच्या खोडी व वागण्यांतील अतिशयोक्ति या सर्वांचा मिलाफ इतक्या कौशल्यानें केलेला असे कीं त्या व्यक्तीच्या तोंडून एकहि अभद्र अगर खोटा शब्द न निघतां अगर प्रेक्षकांकडे वळून आपल्या खऱ्या मनोव्यापाराची ओळख देण्याची गरज न भासवतां, ती व्यक्ति हास्यास पात्र होत असे.

या गंभीर स्वरूपाच्या विनोदानें त्यानें लोकांना हंसवितां हंसवितां नैतिक धडेहि दिले, आपण चुकतों कोठें हें दाखवून देऊन त्यांना विचार करा-वयास लावलें. म्हणूनच म्युसे ( Musset ) या फ्रेंच कवीनें मोलिएरच्या नाटकांबद्दल म्हटलें आहे : "आपण हंसण्याकरतां मोलिएरच्या नाटकाला जातों;





अनुक्रमणिका

परंतु आपलेच गंभीर दोष दाखविलेले पाहून आपणावर रडण्याची पाळी येते ! ''

वरील सर्व नाटकांतून त्यानें कोणा विवक्षित व्यक्तीवर हल्ला केलेला नाहीं. उलट बरेच डॉक्टर त्याचे मित्र होते. जे दांभिक, ढोंगी व हटवादी असतील अशा वर्गावर त्यानें आपलें शस्त्र उगारलें. जे लोक जुनीं तत्वें पडताळून न पहातां त्यांच्यावर अंध विश्वास ठेवीत, त्यांच्यावर त्याचा अधिक कटाक्ष असे. वैद्यकीय शास्त्र हें प्रगतिशील शास्त्र आहे, असा त्याचा भरंवसा होता. त्याच्या मतें मानवजातीचा सर्वांत मोठा शत्रु म्हणजे अंधश्रद्धा.

त्याचप्रमाणें मोलिएरची निसर्गावर निष्ठा होती. जर इतर प्राणी आपले रोग नैसर्गिक उपायानें बरे करतात तर माणसांना तीच गोष्ट कां साधूं नये असा त्याचा सवाल होता. माफक आहार, योग्य व्यायाम व विश्रांति यांसारखीं औषधें त्रिभुवनांत आढळणार नाहींत; औषधें व उपचार शोधून काढलेच तर ते असे असावेत कीं, त्यामुळें निसर्गाला मदत व्हावी, असें त्याचें म्हणणें असे.

---

## आशियावर जगाची शांति अवलंबून आहे

सर्व खंडांची माता, इतिहासांतील एका महान् संस्कृतीची जननी अशी महान् आशियाची खंडभूमि आज जागृत झाली आहे. आशियाच्या नवोदित स्वातंत्र्याच्या उषःकालीं आज जी वादळी हवा दिसत आहे तिचें कारण गेलीं दोनशें वर्षे आशियाची जी भयंकर कुचंबणा झाली हें आहे. त्यामुळें जिकडेतिकडे वैफल्याची भावना पसरली आणि नवीन क्रांतिशक्ती रसरसूं लागल्या. या शक्तींची प्रेरणा प्रामुख्यानें राष्ट्रवादी आहे. ह्या शक्ती राजकीय स्वातंत्र्यप्राप्तीकरितां धडपडत असलेल्या दिसत असल्या तरी त्या शक्तींच्या मागें खरी प्रेरणा आर्थिक आहे. जनतेची आर्थिक स्थिति कशी सुधारेल याची तळमळ त्यामागें आहे. जेथें राष्ट्रवादाला दडपण्याचा प्रयत्न झाला, तेथें संघर्षच उत्पन्न झाला. आग्नेय-आशियामध्यें त्याचें प्रत्यंतर आज आपणांस दिसत आहे. आग्नेय-आशियामधील हल्लीचा संघर्ष हा दोन ध्येयप्रधान विचारसरणींमधील संग्राम ( Ideological conflict ) आहे, असें मानणें चुकीचें आहे. केवळ तेथीलच नव्हे, तर आशियाच्या बहुतेक भागांतील असंतोष आणि संघर्ष यांचें मूळ कारण जनतेच्या दडपलेल्या स्वातंत्र्याकांक्षा आणि भयंकर दारिद्र्य हें होय. हा संघर्ष नाहींसा करायचा मुख्य उपाय म्हणजे स्वातंत्र्य शक्य तितक्या लवकर देणें, व जनतेची ददात नाहींशी करणें हा होय. हें झालें तरच आशियाचें शांतताप्रस्थापनाच्या बाबतींत मोठें सहाय्य होईल. कारण आशियाचें तत्त्वज्ञान प्राचीन काळापासून आजपर्यंत शांतिप्रधान असेंच बनत आलें आहे. आशियामधील परिस्थितीचा विचार करतांना आणखी एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. आशिया जणूं बंड करून उठत आहे असें वाटतें तें कां ? या प्राचीन खंडांतील लोकांचा कांहीं पाश्चात्य राष्ट्रांच्या अरेरावीमुळें दुखावलेला व त्यामुळें उफाळून आलेला स्वाभिमान त्याला कारण आहे. कांहीं देशांतून वंश–वर्णमूलक विषमता अजूनहि दिसत असून आशियाचें महत्त्व त्या देशांना अजून पटलेलें नाहीं. आशियामध्यें वर्णभेद नाहींसा व्हावा, सर्वत्र स्वातंत्र्य प्रस्थापित व्हावें, याबद्दल हिंदुस्थाननें जो जोराचा पुरस्कार चालविला आहे, तो ऐतिहासिक आणि भौगोलिक दृष्ट्या नैसर्गिकच असा परिपाक आहे. कोणत्याहि देशावर वा जमातींवर हिंदुस्थानला वर्चस्व स्थापावयाचें नाहीं, किंवा हिंदुस्थानला नेतृत्वाचीहि हांव नाहीं. बलवत्तर अशा परिस्थितीमुळेंच आम्हांला या गोष्टींचा पुरस्कार करावा लागत आहे. कारण आशियाचे हे मूलभूत प्रश्न सुटल्याखेरीज, जगांत शांति नांदणें शक्य नाहीं, अशी आमची खात्री झाली आहे.

—पं. जवाहरलाल नेहरू

( कॅनडाच्या पार्लमेंटपुढील भाषणांतून–२५-१०-४९ )

# ‘ आमार जीबनइ आमार बानी ’

‘ आमार जीबनइ आमार बानी ’ ¹
वहाणीं बोलतें गंगेचें पाणी
क्षाळितें पाप
वारितें ताप
खालचें जीवन वरती आणी
‘ आमार जीबनइ आमार बानी ’ १

‘ आमार जीबनइ आमार बानी ’
उषेच्या उगमीं द्विजांचीं गाणीं
इंदिरा श्रमे
धरित्री नमे
ओटींत घेऊन रत्नांच्या खाणी
‘ आमार जीबनइ आमार बानी ’ २

‘ आमार जीबनइ आमार बानी ’
कर्मीत श्रद्धा जागे प्रमाणीं
लाविते दीप
आत्म्यासमीप
भविष्य रेखीत युगांच्या ध्यानीं
‘ आमार जीबनइ आमार बानी ’ ३

‘ आमार जीबनइ आमार बानी ’
शब्दां न उसव, जहालों मौनी
आर्तांचे डोळे
पाहून ओले
श्रद्धा, उषा आणि जहालों पाणी
‘ आमार जीबनइ आमार बानी ’

—श्री. बा. भ. बोरकर

---

¹ नोआखाली-यात्रेमध्यें म. गांधींजवळ कोणी स्वाक्षरी-संदेश मागितला असतांना त्यांनीं हें “ आमार जीबनइ आमार बानी—माझें जीवनच माझा संदेश आहे. ”



अनुक्रमणिका

प्रा. रा. वि. ओतुरकर

# पं. नेहरू यांची ऐतिहासिक दृष्टि

वर्तमानकालांत नित्य वावरणाऱ्या व ऐतिहासिक महत्त्वाची कामगिरी करणाऱ्या पं. जवाहरलाल नेहरूंचें मन भारताच्या भूतकालीन भव्यतेंत स्वच्छंद रममाण होणारें आहे. देशाच्या जीवनांत आपल्या थोर कामगिरीनें नवें पान लिहिणाऱ्या सर्वच थोर पुरुषांचें मन इतिहाससंस्कारक्षम असतें असें नाहीं. महंमद पैगंबर, येशू खिस्त किंवा वर्तमानकालास नजीकचे असे महात्मा गांधी यांची जगाच्या इतिहासांत कालचक्रास गति देणारे थोर पुरुष म्हणून गणना होते याबद्दल दुमत नाहीं. पण तिघांनाहि इतिहासापासून स्फूर्ति मिळाली किंवा त्यांनीं भूतकाळांतून वर्तमानाचा कसा उदय झाला हें पाहिलें, किंवा साम्राज्यांच्या उदयास्तांबद्दल सामान्य सिद्धांत मांडले असें म्हणण्यास आधार नाहीं. या विभूतींचें थोरपण स्वतंत्र व वेगळें आहे. पं. जवाहरलाल यांची गोष्ट भिन्न आहे. म. गांधी व पं. जवाहरलाल या दोघांनींहि आत्मचरित्रें लिहिलीं आहेत. पण महात्माजींचें आत्मचरित्र हें सत्याचे प्रयोग अथवा आत्म्याचा आविष्कार आहे, तर पं. जवाहरलाल यांच्या आत्मकथनांत समकालीन समाजाविकासाहि भरपूर प्रतिबिंब झालेला आहे. पं. जवाहरलाल यांनीं आत्मचरित्राखेरीज 'ग्लिम्प्सेस ऑफ वर्ल्ड हिस्टरी' व 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' हे ग्रंथ लिहिले. अनेक घडामोडींनीं गजबलेल्या त्यांच्या आयुष्यांत सुदैवानें त्यांना कारावासांत स्वस्थता लाभली व त्यायोगानें आपणांस या दोन बहुमोल ग्रंथांचा लाभ झाला. पण हे दोन ग्रंथ लिहिण्यास त्यांना कदाचित् स्वस्थता न लाभती तरीहि त्यांच्या मनाची ऐतिहासिकता त्यांच्या प्रासंगिक लेखन-भाषणांतून भरपूर प्रत्ययास येण्यासारखी आहे. या ऐतिहासिकतेचें स्वरूप थोडेबहुत स्पष्ट करावें असा या लेखाचा उद्देश आहे.

## इतिहासाचा हौशी अभ्यासक

पंडितजी नुसतें स्वप्नाळूपणानें इतिहासांत रममाण होणारे नाहींत. फुरसतीच्या काळांत आपापल्या कुवतीप्रमाणें व आवडीप्रमाणें कुणास वेदान्त वाचावासा वाटतो तर कोणी ऐतिहासिक वीरांच्या कथा अगर शास्त्रीय ग्रंथ वाचतो व शक्य असेल तर लिहितोहि. पंडितजींच्या आयुष्यांत अशी उद्योगाचा काल व फुरसतीचा काल यांची फारकत झालेली नाहीं. दिल्ली येथें गेल्या डिसेंबरांत 'इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशन' च्या बैठकीच्या उद्घाटन-प्रसंगीं भाषण करतांना पंडितजी म्हणाले : "मी इतिहासकार नव्हे, पण त्या विषयाचा हौशी अभ्यासक आहे व इतर कोणत्याहि विषयापेक्षां फुरसतीच्या वेळीं माझें इतिहासांतच चित्त विशेष लागतें. इतकेंच काय ! पण कित्येक वेळां असेंहि वाटतें कीं ही राजकारणाची धकाधकी सोडून देऊन विश्वविद्यालयाच्या परिसरांत एकांत स्थळीं निवांत बसावें व इतिहासाचा मनसोक्त अभ्यास करावा. पण खरें बोलावयाचें तर हा विचार म्हणजे फार दिवस बाहेर पडलेल्यास त्या आयुष्याचा कंटाळा येऊन घरची ओढ लागावी तशासारखा आहे. प्रत्येक माणसाला त्याच्या आयुष्यांत आपल्या रोजच्या कामांत बदल हवासा वाटतो त्या सारखाच हा विचार होय." पंडितजींना इतिहास हा केवळ त्यांच्या नुसत्या फुरसतीच्या अभ्यासाचा विषय वाटत नाहीं. वर्तमानकालाच्या घडामोडी समजून घेण्याचा यत्न करण्यासाठीं पंडितजी इतिहासाकडे








धाव घेतात. कारण त्याच भाषणांत पंडितजी पुढें म्हणतात : "चालू इतिहास घडविण्यांत प्रमुख भाग घेणाऱ्या व्यक्तींनें इतिहासाची घडण समजून घेतली पाहिजे. त्याखेरीज त्यास मानवी जीवनाचीं मुख्य सूत्रें कळणार नाहींत व तो तपशीलांत गुंतून पडण्याची भीति आहे. गेलीं २०-२५ वर्षें माझ्या सन्मान्य सहकाऱ्यांसमवेत मी या देशाच्या चालू कथारसाचा एक भाग बनलेलों आहे. अशा वेळीं मला व्यक्तिशः इतिहास आवडतो म्हणूनच केवळ नव्हे, तर भूतकालांतून वर्तमानाचा उदय कसा झाला हें समजून घेण्याचा प्रयत्न करण्यासाठीं म्हणून, तसेंच त्याच्याच साह्यानें अंधुकतेनें कां होईना पण या देशाच्या भविष्यकालाकडे नजर टाकतां आली तर पहावें म्हणून मला इतिहासाचा अभ्यास करणें अत्यंत आवश्यक आहे असें वाटतें." 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' या ग्रंथांत पंडितजी लिहितात : 'मला कळूं लागलें तेव्हांपासून मी हिंदी स्वातंत्र्याच्या संग्रामांत भाग घेऊं लागलों; त्याच वेळीं भारताच्या स्वरूपासंबंधीं माझें मन विचार करूं लागलें. स्वातंत्र्य-संग्रामांत ज्या भारताची हांक मला ऐकू येते,तो भारत कोणता ? याचा विचार माझ्या मनांत आला. एवढा निसर्गसंपन्न व भाग्यशाली भूतकाळ असलेला आपला देश पांच हजार मैलांवर असलेल्या ब्रिटिश साम्राज्याच्या टांचेखालीं दबला जावा व साम्राज्यसत्तेच्या दावणींत रहावें लागल्यानें या देशास दारिद्र्य व अवदशा प्राप्त व्हावी हा काय प्रकार आहे ! या स्थितींतून या देशास मुक्त केलेंच पाहिजे हें स्वातंत्र्याच्या लढ्यांत भाग घेण्यास मला पुरेसें कारण आहे" (पृ. ४१). यावरून पंडितजी हे प्रारंभीं तरी इतिहासाकडे राष्ट्राभिमान्याच्या भूमिकेवरून पाहूं लागले हें स्पष्ट दिसतें.

## व्यापक आणि गतिमान् दृष्टिकोन

पण इतिहासाच्या अभ्यासानें स्फूर्ति प्राप्त होते अशा नुसत्या स्थूल व (romantic) काव्यमय दृष्टीनें पंडितजी इतिहासाकडे पहात नाहींत. पंडितजींच्या स्वभावाचे सर्व गुण त्यांच्या इतिहासाच्या अभ्यासांतहि दृष्टीस पडतात. प्राचीन काळीं मौर्य-गुप्तादींचीं महाराज्यें जेथें स्थापन झालीं व कोसळलीं, जेथें भगवान् बुद्धानें धर्मोपदेश करण्यासाठीं गृहसुखाचा त्याग केला, जेथें प्राचीन काळीं अनेक शास्त्रें व कला उदय पावल्या व पुढें नष्ट झाल्या, त्याच भागांत पंडितजी लहानाचे मोठे झाले. पंडितजींच्या मनाचा पिंड या भागांत तयार झाला असल्याची साक्षहि त्यांच्या लेखनांत दृष्टीस पडते. प्राचीन इतिहासाचें विहंगमावलोकन करतांना पंडितजी गंगेच्या प्रवाहाशीं थबकून म्हणतात: 'ज्या गंगेनें अखिल भारतवासीयांचें चित्त आकृष्ट केलें आहे ती गंगा ! जिच्यांत स्नान करून पावन होण्यासाठीं शतकानुशतकें भारतीय जिच्याकडे धांव घेत आहेत ती गंगा ! गंगेच्या उगमापासून तिच्या मुखापर्यंत, व प्राचीन काळापासून आजतागायतचा गंगेचा इतिहास म्हणजे हिंदी संस्कृतीच्या चढ-उताराचा इतिहास होय, साम्राज्यांच्या उदयास्ताचा इतिहास होय, भव्य नगरींचा व विशाल बुद्धिमान् पुरुषांच्या पराक्रमाचा इतिहास होय. येथें अनेक पराक्रम झाले. येथें थोर पुरुषांनीं संसाराकडे पाठ फिरवून जगांतील सत्तत्वाचा शोध चालविला, येथें भरभराट आली व प्रलयकालहि आला. उन्नति, अवनति, वाढ व उतरती कळा, जीवन व मरण हें सर्व जेथें घडलें ते गंगेचे तीर ! तो गंगेचा प्रवाह!!' (पृ. ४३).

पंडितजींची इतिहासाकडे पाहण्याची दृष्टि व्यापक, सापेक्ष, गतिमान्, उपयुक्ततावादी, व भावनावादी अशी आहे हें सिद्ध करण्यास त्यांच्या लेखांतून अनेक उतारे देतां येतील. पं. नेहरू म्हणतात : 'सामान्य मनुष्य इतिहासाकडे मनुष्याच्या समग्र जीवनाचें ज्ञान व्हावें म्हणून धांव घेतो. स्वतःची प्रगति करून घेण्यासाठीं मनुष्याची धडपड असते, त्यासाठीं तो आपल्या अमूर्त विचारास साकार करण्याची धडपड करतो त्यांत त्यास कधीं यश मिळतें तर कधीं प्रगति करणें म्हणजे काय हेंच त्यास कळत नाहीं. तरीहि त्याची धडपड चालू असते. अशा व्यापक धडपडीचें वर्णन म्हणजे इतिहास. एकेकाळीं इतिहास-लेखनांत राजकीय व धार्मिक जीवनावर विशेष भर दिला जाई. आज-काल आर्थिक घडामोडींवर विशेष भर दिला जात

आहे व तें सकारणहि आहे. पण आर्थिक घडामोडी एवढाच कांहीं इतिहासाचा विषय नव्हे. इतर बाजूंनींहि इतिहासाचा अभ्यास झाला पाहिजे '. महात्माजींच्या सहवासानें गूढवादाची छटा आलेल्या पंडितजींच्या मनाचें नुसत्या जडवादानें समाधान न व्हावें हें साहजिक आहे. मानवी जीवनाच्या विविध अंगांचा सामग्र्यानें व परस्परसंबद्धतेनें इतिहासांत अभ्यास झाला पाहिजे, असें पंडितजींचें मत आहे.

राजकारणांत दिसून येणारी त्यांची आंतरराष्ट्रीय दृष्टि ते इतिहासांतहि वापरतात. हिंदुस्थानच्या इतिहासाकडे जगाच्या इतिहासाचा एक भाग म्हणून सापेक्षतेनें पाहून त्यांनीं ठिकठिकाणीं तुलनात्मक दृष्टि ठेवून विवेचन केलें आहे. एखादा मानवी समाज एकाएकीं चैतन्यमय होऊन कित्येक वेळां विशेष कामगिरी करून जातो. कित्येकदां तें चैतन्य नाहींसें होतें व तेथील संस्कृति स्मृतिशेष होते. या चैतन्याचें स्वरूप कोणतें ? आजच्या जगांत अमेरिका, रशिया व चीन हीं राष्ट्रें विशेष चैतन्ययुक्त दिसतात. त्यांना कांहीं नवीन साध्य करावयाचें असें दिसतें, हिंदुस्थानहि आपली कात टाकून चैतन्य प्रगट करीत आहे. हिंदुस्थानांतील हा जीवनप्रवाह कुणाशीं अधिक जुळता आहे ? असा प्रश्न त्यांनीं ' डिस्कव्हरी ऑफ इंडिया ' या पुस्तकांत ( पृ. ४९ ) उपस्थित केला असून त्यावर आपल्या मताप्रमाणें उत्तर दिलें आहे. त्या उत्तराशीं तूर्त आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. पंडितजींची सापेक्ष व तुलनात्मक दृष्टि म्हणजे काय याचें दिग्दर्शन वरील उताऱ्यांवरून होण्यासारखें आहे. तुरुंगांतून इंदिरेस पाठविलेल्या पत्रांच्या निमित्तानें जगाच्या इतिहासाचें भारतीय चष्म्यांतून ओझरतें दर्शन घडविणारें, व जागतिक घडामोडींत हिंदुस्थानचें स्थान कोणतें हें सूचित करणारे पंडितजी हे पहिलेच हिंदी लेखक आहेत. या अकराशें पृष्ठांच्या इतिहासांत तिसरा हिस्सा शेवटच्या पन्नास वर्षांच्या घडामोडींच्या वर्णनानें व्यापलेला आहे ही गोष्ट पंडितजी इतिहासाकडे वर्तमानाच्या भूमिकेवरून पहातात हें सिद्ध करण्यास पुरेशी आहे.

## संघर्षापेक्षां सहकार्यावर भर

समाजापुढें येऊन पडलेल्या प्रश्नांचें स्वरूप कालदेशवर्तमानानुरूप बदलणारें असतें व त्यास अनुसरूनच त्या त्या पिढींतील अभ्यासकांनीं आपापल्या विषयाकडे पाहिलें पाहिजे या गोष्टींची जाणीव पंडितजींना आहे. इतिहासाचें सार थोडक्यांत सांगतांना पंडितजी म्हणतात : 'मनुष्यांच्या किंवा मानवसमूहांच्या परस्परसंबंधांचें वर्णन म्हणजे इतिहास होय. एक मनुष्य दुसऱ्यास किंवा एक मानवी समूह दुसऱ्या समूहास जेव्हां भेटतो तेव्हां त्या भेटींत दोन प्रकारचे संबंध निर्माण होतात. परस्परांची गरज भागविण्यासाठीं सहकार्य करणें किंवा एकानें दुसऱ्यावर कुरघोडी करण्यासाठीं संघर्ष करणें. अनेक राज्यें, सुधारणा व युद्धें या सर्वांचें सार या दोन प्रकारांत सामावतां येईल. इतिहासलेखकानें मानवी जीवनप्रवाहाचें वर्णन करतांना संघटन व सहकार्य यांच्या वर्णनावर जोर द्यावयाचा कीं विघटन व संघर्ष भडक रीतीनें रंगवावयाचे हा त्यानें विचार करून ठरवावयाचा प्रश्न आहे. इतिहासकारानें आपलीं मतें आगाऊ ठरवून त्या दृष्टिकोनांतूनच तेवढा इतिहास पहावा असा याचा अर्थ नाहीं. पण हातांत लेखणी उचलून इतिहासलेखक जेव्हां लेखन करूं लागतो तेव्हां तो वर्ण्य वस्तूंचें समग्र वर्णन करूं शकत नाहीं. जेथें लेखन आलें तेथें निवडही अपरिहार्य आहे. कांहीं निवड केल्याशिवाय कथालेखनाची जुळणी होऊं शकत नाहीं. एकदां निवड करावयाची ठरल्यावर ज्याची त्याची निवड व ज्या त्या कालांतील निवड भिन्न भिन्न असणार हें जर खरें असेल तर काय सांगावें व काय गाळावें, कोणतें अधिक महत्त्वाचें आहे व कोणतें कमी महत्त्वाचें आहे हें ज्याचें त्यानें ठरवावयास हवें. ' हा उताराहि पंडितजींनीं ' हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशन ' पुढें केलेल्या भाषणांतून घेतला आहे. इतिहासकारानें मानवी जीवनांतील संघर्षापेक्षां सहकार्याच्या वर्णनावर भर द्यावा असें पंडितजींना सूचित करावयाचें आहे. भारताचे पहिले पंतप्रधान पं. जवाहरलाल यांच्यापुढें स्वातंत्र्यकालांतील समाजरचनेचें अवघड असें विधायक काम येऊन पडल्यावर त्यांनीं इतिहासकारांना 'संघर्षांच्या

वर्णनापेक्षां सहकार्याचें वर्णन करा ' हा संदेश देणें क्रमप्राप्त होतें. नाहीं तरी हें खरेंच आहे कीं, आपण इतिहासांत युद्धकलह, भांडणें, तहनामे, करार यांना किती तरी जागा देतों! याच्या उलट ज्या संस्थांच्या व सहकार्याच्या योगानें मानवी समाज गुण्यागोविंदानें राहून सुखाचा व शांतीचा अनुभव घेतो त्या सर्वांचें ओझरतें दर्शनहि आपणांस होत नाहीं. इतिहासलेखनाचा हा दृष्टिकोन बदलला पाहिजे. इतिहासकारास विशिष्ट दृष्टिकोन असणें हें अपरिहार्य आहे. त्यास दृष्टिकोन असावा पण त्यानें पक्षपाती असूं नये, व पूर्वग्रहदूषित तर असूंच नये असा सिद्धांत मांडावा लागेल. अर्थात् अशाप्रकारें लेखन करणें ही तारेवरची कसरत आहे. पण कुशल इतिहासकारानें तींत यश मिळविण्याची ईर्षा बाळगली पाहिजे. परंतु पंडितजींच्या या विवेचनासंबंधीं मला एवढें मात्र म्हणावेसें वाटतें कीं सहकार्य व संघर्ष हीं परस्परांहून अलग राहूं शकत नाहींत. सहकार्य करतां करतां संघर्ष निर्माण होतो व संघर्षांतून सहकार्य जन्म पावतें. अशा वेळीं इतिहासलेखकास सहकार्याचें वर्णन करतां करतां संघर्षाबद्दलहि बोलावें लागेल व तो संघर्ष जितका कमीअधिक उग्र असेल त्या मानानें त्यावर भर द्यावा लागेल. एरव्हीं मानवी जीवनांतील सहकार्याचें वर्णनहि पुरें होऊं शकणार नाहीं.

## वाङ्मयीन सौंदर्य

पंडितजींची गतिमान् व उपयुक्ततावादी ऐतिहासिक दृष्टि म्हणजे काय याचें दिग्दर्शन वरील ओघांत येऊन गेलें आहे. उत्कृष्ट कल्पनाशक्ति, विविध जीवनाचा अनुभव, संस्कारक्षम मन व या सर्वांपेक्षां वर्ण्य विषयाशीं झटकन् समरस होण्याची तयारी या सर्वांमुळें पंडितजींचें इतिहासविषयक लेखन हें वाङ्मयाचा अमूल्य ठेवा बनलें आहे यांत शंका नाहीं. ' डिस्कव्हरी ऑफ इंडिया ' हा त्यांचा ग्रंथ वाचून लॉर्ड माउंटबॅटन यांना पंडितजींच्या व्यक्तित्वाची विशेष कल्पना आली. पंडितजींच्या आयुष्यांत जेव्हां जेव्हां महत्त्वपूर्ण असे प्रसंग आले तेव्हां तेव्हां त्यांचीं भाषणें समयोचित व हृदयाचा ठाव घेणारीं अशींच झालीं. ' हिंदुस्थान हें स्वायत्त व सार्वभौम लोकराज्य आहे ' (Independent Sovereign Republic) हा ठराव घटनासमितीसमोर मांडतांना ता. १३ डिसेंबर १९४६ रोजीं पंडितजींनीं प्रसंगाशीं समरस होऊन केलेलें अर्थगर्भ भाषण इतिहासांत चिरंजीव होण्यासारखें व त्यांच्या मनाची ऐतिहासिकता स्पष्ट दाखविणारें असें आहे. पंडितजी म्हणाले :

" मित्रहो ! या महत्त्वाच्या प्रसंगीं मी आपणांसमोर उभा असतांना माझें चित्त विविध घटनांनीं भारावून गेलेलें आहे. आपल्या इतिहासांतील एक कालखंड संपला. यावेळीं मला हिंदुस्थानचा गेल्या ५००० वर्षांचा भव्य भूतकाल आठवतो. मानवजातीच्या इतिहासाचा प्रारंभहि याहून अधिक जुना नाहीं. तेव्हांपासून आजपर्यंतचा काळ ! या विस्तृत कालांतील विविध घडामोडींनीं माझें चित्त व्याप्त झालें आहे. या आठवणींत एक प्रकारची मादक उत्तेजकता आहे. व त्याबरोबरच त्या आठवणींमुळें माझें चित्त कांहींसें अस्वस्थ होत आहे. भारताच्या भव्य भूतकालाला शोभून दिसण्यास मी पात्र आहे का ? असा प्रश्न मनांत येतो. त्याबरोबरच माझी भविष्यकालाकडे नजर जाते. हा भविष्यकाल माझ्या मतें उज्ज्वलतर असाच आहे. भव्य भूतकाल व भव्यतर भविष्यकाल या दोहोंच्यामध्यें तरवारीच्या पात्याप्रमाणें तळपणाऱ्या वर्तमानाच्या कांठावर मी उभा असतां माझें मन किंचित् साशंक होतें व पुढें असलेल्या कठीण जबाबदारीच्या जाणिवेनें माझें मन भारावून जातें. जुन्यांतून नव्या युगाचा उदय होत आहे. या संक्रमणाच्या क्षणांत खरोखर कांहीं जादू आहे कीं नाहीं तें मला माहीत नाहीं, पण मला मात्र ती भासते. रात्रीच्या अंधकारांतून जेव्हां दिवसाचा उजेड प्रकाशमान होतो तेव्हां ज्या प्रकारचा अतर्क्य आनंद होतो व सृष्टीच्या अतर्क्य जादूगिरींत मन रममाण होतें, तशा प्रकारच्या आनंदांत माझें चित्त गुंतून राहिलें आहे. हा उगवणारा दिवस कदाचित् अभ्रपटलांनीं व्याप्त असेल; परंतु दिवस तो दिवसच. एकदां आकाश निरभ्र झालें कीं आपणांस सूर्यदर्शन होणारच ! " (कॉन्स्टिट्यूअंट ॲसेंब्ली डिबेटस् अहवाल, खं. १ ला, अंक ५ वा, पृष्ठ ५८–





अनुक्रमणिका

५९ ). पंडितजींच्या मनाची ऐतिहासिकता वरील उताऱ्यांत किती उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झाली आहे त्याचा वाचकांनींच प्रत्यय पहावा.

## वर्तमानाकडून भूतकालाकडे नजर

पंडितजींच्या मनाची ऐतिहासिकता उच्च दर्जाची असली तरी पंडितजींची भूमिका इतिहासकाराची नव्हे हें मुद्दाम सांगितलें पाहिजे. पंडितजी हे डॉ. भांडारकरांप्रमाणें उपलब्ध प्रमाणांवरून अर्थ लावून स्थलनिर्णय किंवा कालनिर्णय करणारे इतिहासकार नव्हेत; कै. राजवाडे यांच्याप्रमाणें भूतकालीन घटनेकडे वस्तुनिष्ठ दृष्टि ठेवून तिचें अंतरंग उकलून दाखविणारे तत्त्वविवेचक नव्हेत किंवा सर जदुनाथ यांच्याप्रमाणें ऐतिहासिक प्रसंग प्रमाणशीर शब्दांत कुशलतेनें वर्णन करणारे कारागीर नव्हेत, किंवा टॉयनबीप्रमाणें मानवी संस्कृतींचा तुलनात्मक अभ्यास करून त्यांतून व्यापक दृष्टीनें निघणाऱ्या इतिहासाच्या तत्त्वज्ञानाची देणगी जगतास हात भरून देणारे गाढे तत्त्वज्ञ पंडितहि नव्हेत. पंडितजी हे वर्तमानकाळांत नित्य वावरणारे व आपल्या कृतीनें इतिहास घडविणारे थोर पुरुष आहेत. वर्तमानाच्या व्यासपीठावरून ते भूतकालाकडे नजर टाकतात; त्याच्याशीं समरस होतात. त्यांतून आपणांस कांहीं मार्गदर्शन होईल का तें पहातात. विशाल कल्पनाशक्तीच्या या पंडिताला लीलेनें भूतकालांत प्रवेश करतां येतो व आजच्या गरजेस अनुसरून तेथील घटनांची मांडामांड करून एक नवीनच संदेश देणारा असा बोलपट त्यांना तयार करतां येतो कीं जो पाहून मोठमोठ्या पंडितांनींहि थक्क होऊन जावें व विद्यमान समाजास मार्गदर्शन व्हावें. भूतकालीन घटनेंतून स्वतःस दिव्य दृष्टि प्राप्त करून घेऊन ती आपल्या वाचकांसहि प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य पंडितजींच्या लेखणींत आहे.

---

## ‘ सुस्वागतम् ’

“ दैवयोग असा होता कीं, तुमच्या देशाकडे जायचा नवीन मार्ग शोधीत असतांना, आमच्या अमेरिका-देशाचा शोध लागावा ! आतां आपण आमच्या देशाला जी भेट देत आहांत, त्या भेटींत आमच्या अमेरिका देशाचा आपणांस निराळ्या अर्थानें ‘ शोध ’ लागून, त्याची ओळख व्हावी, अशी आमची इच्छा आहे. ”

—प्रे. ट्रूमन, वॉशिंग्टन, ११–१०–४९

---

## आमचें ध्येय

अमेरिकेप्रमाणेंच अवाढव्य असलेल्या या भारतांत मध्यवर्ती सत्तेचें नियंत्रण आणि घटकांची स्वायत्तता यांतील संबंध मोठे नाजूक असतात. त्यांत समतोलपणा सांभाळणें अवश्य होऊन बसतें. स्वातंत्र्य, समता आणि प्रगति यांबद्दल जिव्हाळा बाळगणारीं सर्व माणसें ज्या मानवी हक्कांची अभिलाषा धरतात, ते मानवी हक्क म्हणजे व्यक्तीचें स्वातंत्र्य, मानवांची समानता आणि कायद्याचें राज्य हे होत. ह्या मानवी हक्कांना आम्हीं आमच्या घटनेंत अग्रस्थान दिलें आहे. आमच्या देशाच्या संस्थांमधून आणि लोकांच्या मनांमधून लोकसत्तेचीं मुळें खोलवर रुजलीं आहेत. आतां तर आम्ही स्वतंत्र राष्ट्रांच्या मंडळांत प्रवेश केला आहे. आम्ही राजकीय स्वातंत्र्य संपादन केलें असलें तरी आमची स्वातंत्र्योत्तर क्रान्ति अद्यापि पुरी झालेली नाहीं. ज्या राजकीय स्वातंत्र्यांत समानतेनें आणि सुखासमाधानानें जगण्याचा हक्क माणसाला मिळत नाहीं, त्या राजकीय स्वातंत्र्यानें माणसाचें समाधान होणें शक्य नाहीं. त्याकरितां आर्थिक स्वातंत्र्याचीच, समृद्धीचीच आवश्यकता असते. म्हणून आम्हांला आज ताबडतोब जर कांहीं करायचें असेल तर तें, आर्थिक प्रगतीच्या आड जी गोष्ट येईल ती नाहींशी करून जनतेच्या जीवनाचा दर्जा वाढविणें हें होय.

—पं. नेहरू, अमेरिकेंतील प्रतिनिधि-सभेपुढील भाषणांतून, (१३।१०।४९)








श्री. नारायण गणेश गोरे

# पंडित नेहरू : इन्द्रवज्र कीं इन्द्रचाप ?

आरूढमद्रीनुदधीन्वितीर्णं भुजंगमानां वसतिं प्रविष्टम् ।
ऊर्ध्वं गतं यस्य न चानुबन्धि यशः परिच्छेत्तुमियत्तयालम् ॥

—रघुवंशम् ६·७७

## जवाहरलालांचें आगळें भाग्य

येत्या १४ तारखेला पंडितजींना ६० वर्षें पुरीं होऊन ६१ वें वर्ष लागणार, म्हणजे जनरूढी-प्रमाणें त्यांची गणना आतां वृद्धांत करावयास हवी. पण जवाहरलालजी आणि वार्धक्य यांची सांगड आमच्या मनाला अजून घालतांच येत नाहीं. जवाहरलालांनीं आपल्या आत्मचरित्रांत पंडित मोतीलालजींच्या चेहऱ्यावर वृद्धपणीं देखील टिकून राहिलेल्या रुबाबदारपणाच्या तेजाविषयीं किंचित् [illegible] लिहिलें आहे आणि तरुणपणांतच आपल्या डोक्याला टक्कल पडल्याबद्दल किंचित् विषाद व्यक्त केला आहे ! पण गेलीं वीस वर्षें मस्तकावर घवघवीत टक्कल वागवणारे जवाहरलाल अजूनहि हिंदी जनतेला तरुणच वाटतात आणि त्यांचा दमदारपणा, त्यांचें हास्य, त्यांची सौन्दर्या-सक्ति, त्यांचें ध्येयवादित्व, त्यांचें लेखनपाटव यांच्या झगमगीत प्रकाशाकडे पाहून अजूनहि हिंदी तरुणांचे डोळे अक्षरशः दिपून जातात.

१९२९ सालापासून पंडितजींना मी पाहात आहे. त्यांच्या भाग्यरवीला ग्रहणग्रस्त झालेला तर [illegible]; पण कधीं मंदतेज झालेलाहि मीं पाहिलेला नाहीं. सुभाषचंद्रांच्या भाग्यचंद्रम्याला शुक्लपक्ष-कृष्ण-पक्षाची उपाधि आहे, ग्रहणें आहेत. फार कशाला ? खुद्द गांधीजींच्या लोकप्रियतेची भागीरथी देखील कोठें क्षीण तर कोठें विशाल, कोठें प्रशांत—निर्मल तर कोठें क्षुब्ध—गढूळ झाल्याचे दाखले आहेत. पण जवाहरलालांचें भाग्य आगळें आहे. दक्षिणोत्तर क्षितिजांना सांधणारें इंद्रधनुष्य आद्यंत सारखेंच कमनीय दिसतें; तसेंच जवाहरलालांचें जीवन आहे. किंवा असेंहि म्हणतां येईल कीं उत्तरोत्तर तें अधि-काधिक रसरंगमय, देदीप्यमान व आकर्षक बनत चाललेलें आहे. गांधीजींचे आध्यात्मिक वारस, हिंदुस्थानचे पंतप्रधान आणि जाग्रत आशिया-खंडाचे नेते या बिरुदांचे तीन चांद शिरावर मिर-विण्याचें भाग्य ज्यांना लाभलें त्यांच्याबद्दल असें म्हणण्याचा साहजिकच मोह होतो कीं,

“ इहैव तैर्जितः सर्गः ” !

## सामान्य जनतेची भावना

पण स्वतःची कीर्ति दिगंत पसरली म्हणून जवाहरलालांना खरें सुख व समाधान वाटावें अशी परिस्थिति आज आहे काय ? पंडितजी हे कांहीं रवींद्रनाथ टागोर, रामन् अथवा मेघनाद सहा, कृष्णमूर्ति वा राधाकृष्णन् यांच्यासारखे कवि, विज्ञानी अथवा ब्रह्मवेत्ते म्हणून गौरविले जात नाहींत. गांधीजींचे वारस, आशियाचे नेते आणि भारताचे पंतप्रधान म्हणून ते जेव्हां गौरविले जातात तेव्हां युद्धांतून महायुद्धाकडे आणि महायुद्धांतून सर्वनाशाकडे





अनुक्रमणिका

णाऱ्या भुलभुलैय्यांत सांपडून बावचळून गेलेल्या जगाला अभिनव संदेश ऐकविणाऱ्या व जगांतील मानवतेला जागवूं पहाणाऱ्या महात्म्याची सध्यां अधोमुख झालेली पताका पुन्हा उंचावण्याची, आणि आशियांतील जनतेच्या धगधगीत असंतोषांतून नवसृष्टि निपजवणारें पायस प्रकटविण्याची जबाबदारी त्यांनीं पत्करावी अशी त्या गौरवामागची भावना असते. निदान सामान्य जनतेची भावना तरी तशी असते. मग ट्रूमन-ॲचेसन-आयसेनहॉवरसारख्या केवळ राजकारण खेळणाऱ्यांच्या मनांतील भावना कोणत्याहि असोत!

## पंडितजींच्या निष्ठेचें अधिष्ठान कोणतें ?

लोकप्रियतेच्या, कीर्तीच्या व व्यक्तिगत सद्गुणांच्या मापानें मोजलें तर आजच्या जगांत स्टॅलिन-व्यतिरिक्त पंडितजींची बरोबरी करील असा दुसरा मनुष्य नाहीं हें मान्य केलें पाहिजे. पण हे दोन पुरुष किती भिन्न! स्टॅलिन कोणत्या प्रेरणेनुसार कार्य करीत आहे, त्याला कोठें जावयाचें आहे, तिकडे जाण्याच्या त्याच्या पायऱ्या कोणत्या आणि त्याची साधनें कोणतीं याची बरीचशी स्पष्ट कल्पना आपणांला आहे. असेंहि म्हणतां येईल कीं, स्टॅलिनचें नांव घेतल्यावर व्यक्ति डोळ्यासमोर न येता पंचमहाभूतासारख्या एका अतिप्रचंड सामर्थ्याचाच बोध आपणांला होतो आणि तें सामर्थ्य वेगवान् आहे, सर्वदमन आहे, याचीहि जाणीव होते. पण पंडित जवाहरलालांचें नांव उच्चारल्यावर नुसते पंडितजीच डोळ्यासमोर उभे रहातात. त्यांच्या मागचें प्रेरणासामर्थ्य कोणतें? त्यांची शक्ति केवढी, त्यांचीं साधनें कशा प्रकारचीं, याचा कांहींच थांगपत्ता लागेनासा होतो. विशेष खेदाची गोष्ट अशी कीं, पंडितजींच्या निष्ठेचें अधिष्ठानभूत तत्त्वज्ञान कोणतें त्याचाहि थांगपत्ता मला अजून बरोबर लागलेला नाहीं. अधिष्ठानभूत तत्त्वज्ञानावांचून लोकोत्तर विभूति ही कल्पनाच पुंडलीकाच्या विटेवेगळ्या विठोबासारखी अनाकलनीय आहे. लोकोत्तर विभूती या आपल्या तत्त्वज्ञानाशीं एकरूपच झालेल्या असतात. त्या तत्त्वप्रणालीचा प्रचार, तिचें आचरण व तिचें संघटन हेंच त्यांचें जीवितकार्य ठरतें आणि तें करीत असतां 'सारे जण विरुद्ध एक' असा प्रसंगहि त्यांच्यावर येतो. 'एकला चलो रे!' हें कडवें म्हणजे युगप्रवर्तक विभूतींच्या जीवनसंगीताचें करुण पण तितकेंच सनातन व उदात्त असें ध्रुपद आहे. त्याचा प्रत्यय बुद्ध, पैगंबर अथवा लेनिन, गांधी आदीकरून श्रेष्ठ पुरुषांच्या जीवनांत येतो तसा पंडितजींच्या जीवनांत दिसून येत नाहीं. "अलीकडचे प्रसंग" ह्या आत्मचरित्रांतील प्रकरणांत पंडितजींनीं जे विचार व्यक्त केलेले आहेत ते वाचले म्हणजे सद्यःस्थितीचें निदान त्यांना झालेलें आहे, याविषयीं शंका उरत नाहीं. ते म्हणतात: "तेव्हां मन खंबीर करून आपण कार्याला आरंभ केला पाहिजे. जनतेच्या स्थितींत उत्तम प्रकारची सुधारणा घडवून आणणें जर सध्यांच्या सामाजिक व आर्थिक पद्धतीला शक्य होत नसेल तर ती पद्धति जिवंत ठेवावी तरी कशाला?" पण परिस्थितीचें सांगोपांग ज्ञान होऊन भागत नाहीं. अमुक एका मार्गाव्यतिरिक्त या परिस्थितींत दुसरा मार्ग उरलेला नाहीं अशी खात्री पटल्यावर गांधिजी जसे हातीं काठी घेऊन मागें न बघतां चालूं लागत, तसें निश्चयानें पाउल उचलणें हें तर विभूतिमत्त्वाचें व्यवच्छेदक लक्षण आहे.

ध्येय आणि मार्ग निश्चित झाल्यावर सामग्रीची जमवाजमव आलीच. प्रेषित, युगकर्ते आणि अतिमानवी व्यक्ती या उत्कृष्ट संघटक असतात असें बहुतकरून आढळून येतें. पंडितजींच्या हातीं कोणती सामग्री आहे? आश्चर्याची गोष्ट अशी कीं संघटना उभारण्याचा, "सगटांचे तणावे" पसरवण्याचा त्यांना कंटाळाच असावा असें दिसतें. एक एक माणूस मिळवून, निवडून, पढवून संघटनेचा पट विणण्याचें किचकट काम कॉंग्रेस अधिकारारूढ होण्याच्या पूर्वीहि पंडितजींनीं केलें नाहीं. आणि अधिकारारूढ झाल्यानंतर तर कॉंग्रेसला पुनरुज्जीवित करण्याचा खटाटोप करीत बसण्यांत कांहीं अर्थ राहिलेला नाहीं, यानंतर होणारे सर्व उपक्रम सरकारी अधिकाऱ्यांच्यामार्फत होणार असल्यामुळें कॉंग्रेसला संजीवन देण्याचें विशेष कारण नाहीं, असें त्यांचें मत बनलें असावें कीं काय,





अशीही शंका त्यांच्या अलीकडील धोरणावरून येते. कारण नोकरशाही ही शचीप्रमाणें आहे. जो इंद्रपदावर बसेल त्याची ती सहचारिणी बनते. तिची निष्ठा इंद्रावर नाहीं, ती इंद्रपदाशीं निगडित आहे. म्हणून ज्याला स्वतःचें ध्येय आहे त्याला आपलीं स्वतंत्र उपकरणें शोधावीं लागत असतात; आणि म्हणूनच संघटनेला महत्त्व प्राप्त होत असतें. हें वर्म गांधीजी ओळखून होते. सत्तांतरानंतर कॉंग्रेसचें उपकरण निरुपयोगी झालें, म्हणून तें विसर्जित करून नवें अवजार बनवावें असें गांधीजींनीं म्हटलें. पण अवजारच नको अथवा नोकरशाहीच म्हणजेच तें अवजार असा भ्रांत युक्तिवाद त्यांनीं मांडला नाहीं. पंडितजींना आपलें जुनें हत्यार मोडल्याची जशी फारशी खंत नाहीं, तसा नवें हत्यार बनविण्याचा हव्यासहि नाहीं. कारण ? कारण ते स्वभावतः जनतेच्या गळ्यांतील ताईत आहेत ! हृदयांतील लाल आहेत ! देशाचे बेताज पातशाह आहेत !

## भावड्या जनतेचें स्वप्नमग्न दैवत

जनतादर्शनानें हेलावून जाण्याचा मनोधर्म पंडित जवाहरलाल नेहरूंच्या ठिकाणीं प्रकर्षानें आहे. जनसंमर्दाचा त्यांच्या मनावर केवढा परिणाम होतो तें त्यांनीं वेळोवेळीं काढलेल्या उद्गारांवरून कोणाच्याहि लक्षांत येईल. पुण्याच्या सभेला उपस्थित असलेला जनसागर पाहून त्यांना विलक्षण समाधान वाटलें तें त्यांनीं अमेरिकेला प्रयाण करण्याच्या जरा अगोदर काढलेल्या उद्गारांवरून दिसून येतें. गांधीजींना बोलतांना मी ऐकलेलें आहे. पण त्यांचें भाषण ऐकतांना मला वाटत असे कीं जनतेकडे त्यांचें लक्ष तरी असतें कीं नाहीं कोण जाणे ! त्यांच्या डोळ्यांसमोर जे प्रश्न तरळत असतील त्यांचें स्पष्टीकरण ते करीत जात; तो विषय पिंजून पिंजून मांडीत. त्यांची वाणी कोणत्या तरी श्रेष्ठ व अशरीरिणी शक्तीचें वाहन बनलेली आहे असें भासें. हिंदुस्थानाच्या या मातीच्या लिवलिवीत गोळ्याला आकार देणारा, त्याला ठोकून भाजून पक्कें रूप देणारा कुंभार मी आहे, याचें विस्मरण त्यांना जणू कधीं होतच नसावें ! पण जवाहरलालांचें तसें नाहीं, नसावें असें वाटतें. आपल्याकडे जनता मनांत कोणता हेतु धरून लोटेत आहे याची त्यांना बरोबर कल्पना येत नसेल असें म्हणवत नाहीं, आणि येत असेल असेंहि म्हणवत नाहीं !

माझें मलाच कधीं कधीं कोडें पडतें; तें असें कीं कोणतीहि एक व्यक्ति अशा प्रकारें कोट्यवधि जनतेचें आराध्य दैवत बनल्यानंतर त्या व्यक्तीची वाढ खुंटेल कीं टिकून राहील ? पंडितजींना असा कधीं संदेह निर्माण होतो कीं नाहीं कीं, ज्या सरकारचा मी प्रमुख त्या सरकारविषयीं एवढी अप्रीति सगळीकडे पसरलेली असतांना आणि ती उत्तरोत्तर वाढत असतांना आपल्या सभोंवार आपण जेथें जाऊं तेथें हजारों-लाखों माणसांचें जें कडें पडतें तें कशासाठीं ? परिस्थितीचें सम्यग्ज्ञान आपणाला होऊं नये, म्हणूनच नियतीनें अचाट लोकप्रियतेचें हें फसवें धुकें आपल्याभोंवतीं सतत ठेवण्याचा निश्चय केलेला आहे कीं काय ? स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अनेक वेळां गांधीजी बोलून दाखवीत कीं मी एकटा पडलों आहे, बाजारांत माझें नाणें आज खोटें ठरलें आहे. तसा कटु साक्षात्कार आपणांला कधीं होत नाहीं हें कसें ?''

जनता सगळीकडून नाडली गेली आहे, तिच्या सर्व आशा विफल ठरल्या आहेत आणि म्हणूनच भलत्या आशेनें आणि बेहोष प्रेमानें ती पंडितजींना कवटाळूं पाहात असते, अशी शंका माझ्या मनांत अलीकडे येते. अत्यंत निराशेचा व आपत्तीचा काल हा कोणाहि व्यक्तीचें काय अथवा दैवताचें काय अवडंबर माजण्याच्या दृष्टीनें पोषक ठरतो. परंतु अंधभक्तीप्रमाणेंच अवास्तव लोकप्रेम हें सुद्धां व्यक्तीला मारक ठरल्याशिवाय कसें राहील ? पंडितजी जसजसे वर चढत जाणार तसतसें त्यांना जनतादर्शन होण्याच्या ऐवजीं केवळ समुदायदर्शन होत जाणार. हालअपेष्टांचे पुष्कळ आंकडे रोज कीर्दीत त्यांना दिसत होते तसें न दिसतां आतां त्यांना दिसणार ती एकुणात, गोळाबेरीज. रोजच्या रगाड्यांत पिचलेले लोक त्यांना दिसणारच नाहींत; दिसतील ते खास समारंभासाठीं उल्हासोत्साहाचे खोटे मुखवटे घालून आलेले हौशे, गवशे व नवशे ! आणि अशा रीतीनें पंडितजींच्या जगद्व्यापी कृपा-

छत्रांत उभ्या राहिलेल्या कॉंग्रेसला जनतेच्या पोटांतलि खऱ्या धगीची खरी कल्पना न येऊं देण्याला पंडितजीच कारणीभूत होतील ! जनतेपासून दूर झालेली कॉंग्रेस पंडितजींना सतत मोठे करण्याचा यत्न करील आणि अधिकाधिक बुडणारी जनताहि पंडित नेहरूंच्या नांवाच्या जयघोषांत स्वतःचें आक्रंदन बुडवून टाकण्यासाठीं धडपडेल. गांवच्या कुलदैवताचा छबिना निघाला कीं, सर्वांत महारांचाच ढोल दणकून वाजावयाचा !

## दृष्टि पहाते पण हात काम करीत नाहींत

अशा ह्या भाबड्या जनतेच्या ह्या स्वप्नमग्न दैवताला एकीकडून कम्युनिझमच्या झंझावाताशीं आणि दुसरीकडून भांडवलशाहीच्या यक्षविद्येशीं सामना करावयाचा आहे आणि आपल्या मार्गाचें श्रेष्ठत्व जगांत प्रस्थापित करावयाचें आहे.गांधीजींच्या वारसदारीचा याहून दुसरा कोणता अर्थ होऊं शकतो तेंच मला समजत नाहीं. 'हुकुमशाहीच्या आसूडावांचून प्रगति करून दाखवनि आणि भांडवलशाहीच्या बटीकपणांतून लोकसत्तेला सोडवीन,' अशा दोन प्रतिज्ञा जर पंडितजींनीं पार पाडून दाखविल्या तर गांधिजींचें स्वप्न त्यांनीं साकार केलें असें ठरून ध्रुवाप्रमाणें अक्षय कीर्तीची जोड त्यांना मिळेल. एका नव्या युगाचे केवळ द्रष्टे नव्हत तर स्रष्टे ते ठरतील. पण रशियाच्या भाग्यविधात्यांना आणि त्यांच्याचप्रमाणें अमेरिकेच्या सूत्रधारांना आमचें वर्म चांगलें ठाऊक आहे. तें म्हणजे आमची दृष्टि जें पाहाते तें आमचे हात करीत नाहींत ! आहे ही समाजघटना आम्हीं टिकवूं शकत नाहीं. आणि नवीन समाजरचना सुरू करण्याची आमची हिंमत होत नाहीं !

हें वर्म ठाऊक असल्या कारणानें आज ह्या दोन राष्ट्रांकडून दोन प्रकारच्या प्रतिक्रिया घडत आहेत. रशियाचा स्टॅलिन आमचा परराष्ट्रीय मंत्री मॉस्कोंत महिनोगणती राहिला तरी त्याची ढुंकून चौकशी देखील करीत नाहीं ! तो हिशोबी आहे: त्यानें कोणाशीं हस्तांदोलन केलें तरी तेवढ्यांत त्याच्या पंजांत कितपत रग आहे हें तो जोखून घेत असतो. मागच्या महायुद्धाच्या काळांतील दंतकथा सांगतात ती अशी कीं, रूझवेल्ट, चर्चिल व स्टॅलिन एकत्र बसले असतां एकदां चर्चिलनें हळूच मुद्दा मांडला कीं युद्धांत आपली बाजू बळकट करण्यासाठीं आपण पोपला ( ख्रिस्ती जगद्‌गुरूला ) आपल्या बाजूला वळवून घ्यावें. रूझवेल्टनें तत्काळ रुकार दिला. त्याला वाटलें कीं पोप आपल्या बाजूस आला तर कॅथॉलिक पंथाच्या ख्रिस्त्यांवर तेवढेंच वजन पडेल. पुढें स्टॅलिनचें मत विचारण्यांत आलें. स्टॅलिननें तोंडांतली पाइप बाजूला सुद्धां न करतां एकच प्रश्न विचारला कीं "तुमच्या त्या पोपपाशीं फौज किती आहे ?"— अशा माणसानें विजयालक्ष्मींची कदर केली नाहीं यांत काय नवल ?

दुसऱ्या बाजूला अमेरिका आहे. तिला ठाऊक आहे कीं, 'आम्हांला तुमच्यापासून कसलीहि अपेक्षा नाहीं' असें आम्ही तोंडभर म्हणत असलों तरी ताकासाठीं आणलेलें आम्ही भांडें लपवीत आहों. म्हणून जगांत कोणत्याहि व्यक्तीला दिला नाहीं असा मान तेथें पंडितजींना मिळत आहे ! आणि त्याबद्दलचीं वर्णनें वाचून आम्ही समाधानाच्या ढेकरा देत आहों ! रशिया आणि अमेरिका यांच्या वागण्यांतला हा फरक म्हणजे जन्मदरिद्र्याला नव्या मातब्बराकडून आणि गर्भश्रीमंताकडून मिळणाऱ्या वागवणुकींतला फरक आहे इतकेंच. रशियाला आमच्याबद्दल वाटणारा तिटकारा व आम्हांला पाहून अमेरिकेला फुटलेला पान्हा हीं एकाच कारणांतून उद्भवलेलीं दोन कार्यें आहेत. सनातनी ब्राह्मण अस्पृश्याला ज्या तुच्छतेनें वागवतो त्या तुच्छतेनें रशिया आम्हांला वागवीत आहे, तर हरिजनसप्ताहांत आधुनिक सुधारक ज्या संशयास्पद आपुलकीनें अस्पृश्यांना जवळ ओढतात तीच आपुलकी अमेरिकेच्या ठिकाणीं दिसत आहे. पण सनातनी काय अथवा नवसुधारक काय, अकृत्रिम सहजतेनें व बरोबरीचा मानव म्हणून अस्पृश्याला कोणीच वागवीत नाहीं !

## पंडितजींचें जीवन कृतार्थ होवो

राष्ट्रसंघामध्यें हिंदुस्थानालाहि मानाची "मानवी" पदवी मिळवावयाची असेल तर गांधीजींना ज्या संस्कृतीचें दर्शन घडलें होतें

## पंडित नेहरू : इन्द्रवज्र कीं इन्द्रचाप ?

आणि ज्याचा घोष पंडितजी वारंवार करीत असतात त्या संस्कृतीचें हिंदुस्थान भाजन बनला पाहिजे, वाहन बनला पाहिजे. भारताला नवयुगाचा ध्वजधारी बनविण्याचा प्रयत्न करण्यानेंच पंडितजींच्या आयुष्याला कृतार्थता प्राप्त होणार आहे. त्या प्रयत्नांत कदाचित् त्यांना आपलें पद सोडावें लागेल. कदाचित् त्यांच्या भोंवतालची ही झळाळीही नष्ट होईल. पण त्यामुळें कृतार्थतेच्या घटांतील एक बिन्दु देखील कमी होण्याचें कारण नाहीं. देवदारूसारखे गगनाला भिडणारे वृक्षराज या दुर्भागी देशांतली भूमि प्रसवते; पण येथील जनता वीतभर उंचीच्या तृणासारखी बापुडवाणीच राहिलेली आहे! आम्हांला इतःपर गगनचुंबी एकांडे देवदारू नकोत आणि बापुडवाणीं तृणेंहि नकोत. आमचें सारें शिवार भरघोंस दाण्यांच्या पिकांनीं दाटलेलें आम्हांला पाहावयाचें आहे.

पंडितजींचें उर्वरित आयुष्य या कार्यासाठीं खर्च व्हावें अशीच इच्छा कोणीहि व्यक्त करील. कोणीहि अशीच अपेक्षा करील कीं आज देशांत ज्या राक्षसी शक्ती मोकाट सुटलेल्या आहेत, त्यांचें निर्दालन करण्याचें वज्रसामर्थ्य पंडितजींच्या ठिकाणीं यावें ! इंद्रचापाचा सप्तरंगी विस्तार मोहक दिसला तरी ती शोभा अर्ध्या–पाव घटकेची. आकाशाचा एक अलंकार यापेक्षां त्याचें मूल्य अधिक नाहीं.

---

## भावी युद्धाचीं कारणें

आधुनिक जगांत युद्धाचीं अंतःस्थ अशीं कारणें कोणतीं ? एक मुख्य कारण म्हणजे एका
राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर वर्चस्व गाजविणें किंवा गाजवायचा प्रयत्न करणें. आतांआतांपर्यंत आशियातील
बरेचसे देश परकीयांच्या—विशेषतः युरोपीय राष्ट्रांच्या आक्रमणाखालीं दडपले गेले होते परंतु आतां
स्वातंत्र्याची अभिलाषा आणि राष्ट्राभिमान यांच्या उधान भरतीपुढें आशियांतील पाश्चात्यांचीं साम्राज्यें
कोसळून पडत आहेत. आफ्रिकेमध्यें बराचसा प्रदेश अजून परकीयांच्या अंकित असून, कांहीं परकीय तर
त्यावर आपलें वर्चस्व वाढवायचाही प्रयत्न करीत असतांना दिसत आहेत. परंतु साम्राज्यवाद आणि
वसाहतवाद यांचे हे अवशेष कालप्रवाहांत नष्ट होणार हें स्पष्ट आहे.—युद्धाचें दुसरें कारण वंशावंशांतील
संबंध. कांहीं मानवी वंश आपण ज्ञानविज्ञानांत केलेल्या प्रगतीनें, युद्धांत मिळविलेल्या विजयानें हुरळून
जाऊन स्वतःला वरिष्ठ वंशाचे व इतर राष्ट्रांना कनिष्ठ वंशाचे मानायला लागले. आशिया आणि
आफ्रिका यांमधून या वांशिक वरिष्ठगंडाचें उघडेंनागडें आणि उद्दट असें प्रदर्शन होत आहे.
मानवेतिहासांतील अत्यंत महान् धर्म पूर्वेकडे उदय पावले आणि युरोप आणि अमेरिका यांचें नांवही
जेव्हां इतिहासाला माहीत नव्हतें अशा वेळीं आश्चर्यकारक अशा संस्कृती पूर्वेकडे निर्माण झाल्या याचा
पाश्चात्यांना विसर पडतो. पाश्चात्यांनीं आशिया आणि आफ्रिका यांमधील रहिवाश्यांना अत्यंत अपमान-
कारक रीतीनें वागविलें असून त्यांना समान हक्क तर राहूंच द्या, साधी माणुसकी व सौजन्यही दाखविलें
नाहीं ! आधुनिक जगाच्या दृष्टीनें ही गोष्ट अत्यंत भयावह आहे. आशिया व आफ्रिका आतां आपल्या
संमोहावस्थेंतून जागे होत आहेत. ही भयावह परिस्थिति जर चालू राहिली तर–काय सांगावें ?–त्यामधून
असा कांहीं वणवा पेटेल, की ज्याची घोर व्याप्ति व परिणाम आज कोणी वर्तवूं शकणार नाहीं ! एका महान्
अमेरिकनानें म्हटलें होतें कीं, 'हा देश अर्धा गुलाम आणि अर्धा स्वतंत्र असा राहूं शकणार नाहीं'
जगही अर्धें गुलामगिरींत आणि अर्धें स्वातंत्र्यांत राहून, शांति नांदूं शकणार नाहीं !—युद्धाचें तिसरें
कारण म्हणजे कोट्यवधी लोक—विशेषतः आशिया आणि आफ्रिका यांमधील—हालअपेष्टा व ददात यांत
पिचत पडले आहेत. पाश्चात्य देशांतूनही हाल व दुःखें जनतेला होत असलीं, तरी त्या मानानें पाश्चात्य सामान्य
माणसाचें जीवन कांहीं अंशीं तरी सुखी आहे. जीवनांतील गरजाच जर भागविल्या गेल्या नाहींत तर
क्रान्तीचा सर्वभक्षक क्षोभ पेटल्याशिवाय रहाणार नाहीं.

**—पं. जवाहरलाल नेहरू,** कोलंबिया विद्यापीठांतील खास पदवीदान-समारंभ-प्रसंगीं केलेल्या भाषणांतून, ( १७–१०–४९ )





अनुक्रमणिका

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# पं. जवाहरलाल नेहरू यांचें थोर व्यक्तित्व

विशाल नेत्र, निरोगी गौर काया, तरतरीतपणा, भावुक आविष्कार, उच्च विचार, आधुनिकता इत्यादि गुणांनीं पं. जवाहरलाल यांचें व्यक्तिमत्त्व कोणाच्याही मनावर खोल ठसा उमटविल्याशिवाय रहात नाहीं. परंतु जवाहरलाल हे खोल मनाचे गृहस्थ नाहींत. त्यांचें मानासिक सर्वस्व उजेडांत बिलोरी कांचेच्या पेटींत ठेवलेल्या जडजवाहिरासारखें चमकत असतें. त्यांचे उच्च विचार हा त्यांच्या भावुकतेचा भाग आहे; व भावुकता हा त्यांच्या मनोरचनेचा प्रधान धर्म आहे.

अत्यंत सुधारलेल्या इंग्लंडसारख्या देशांत त्यांचें मुख्य शिक्षण झालें असल्यामुळें आधुनिक सभ्यता त्यांच्या आंगवळणीं पडली आहे. त्यामुळें त्यांचे महत्त्वाचे भावनाप्रधान आविष्कारही कित्येक वेळां अद्ययावत् विचारांनीं प्रभावित झालेले दिसतात. गेल्या दीडशें वर्षांच्या इतिहासांत भारतीय नेत्यांमध्यें आधुनिक जागतिक संस्कृतीशीं तन्मय झालेले, लोकमान्यता पावलेले थोर पुरुष काढले तर फार थोडे सांपडतील. त्यांत जवाहरलालांचें स्थान फार मोठें समजलें जातें, याचें कारण त्यांचें पाश्चात्य विद्यापीठांतील शिक्षण होय.

जवाहरलालजींच्या जीवनाचा, मानसिक घटनेचा अर्थ समजावून घेण्याची फार गरज आहे. त्यामुळें आजचा सर्वांत वरिष्ठ प्रश्न सोडविण्यास फार चांगली मदत होईल. तो प्रश्न म्हणजे, भारतीय राजकारण हें जागतिक शांतता स्थापन करण्याचें शक्तिपूर्ण साधन कसें बनेल, हा होय. हा प्रश्न अत्यंत बिकट आहे. मनुष्यजातीच्या भवितव्याशीं निगडित असलेला हा प्रश्न आहे. त्याकरितां जवाहरलालांचें व्यक्तित्व समजून घेतलें पाहिजे.

मनोविश्लेषणशास्त्र ऐतिहासिक महान् व्यक्तींच्या व्यक्तित्वाचा समग्र अर्थ उलगडून सांगण्याइतकें पुढें गेलेलें नाहीं. हें जरी खरें असलें तरी त्याचें त्या बाबतींतलें परिमित यशही कांहीं कमी उपयुक्त नाहीं. त्या शास्त्राच्या आधारें इतिहासांतील कांहीं नमुनेदार थोर व्यक्ती शोधून त्यांच्या द्वारें विद्यमान व्यक्तींच्या व्यक्तित्वाचा अर्थ शोधला पाहिजे. अशा ऐतिहासिक व्यक्तींचे इतिहास व पुराणकथा यांनीं चित्रिलेले नमुने काल्पनिकही असूं शकतील. ते काल्पनिक असले तरी कांहीं हरकत नाहीं. काल्पनिकतेमुळें गहन अभिप्राय उघडा करून दाखविण्याचें सामर्थ्य कमी होत नाहीं. कारण मनुष्यजातीच्या अनेक युगें सांठलेल्या अपरिमित अनुभवानें त्या व्यक्तींच्यावर संस्कार करून त्या व्यक्ती निर्माण केलेल्या असतात. अशा व्यक्तित्वाचा नमुना मिळविण्याकरितां डॉ. फ्रॉईडनें प्राचीन काल्पनिक कथांचा आश्रय केला. प्राचीन लोकप्रसिद्ध अनेक कथा मनुष्यांच्या दीर्घ प्रत्ययाच्या सूचक असतात.

## आत्मसमर्पण : आत्मनिष्ठा

जवाहरलालांचें व्यक्तित्व समर्पणपर आहे. 'समर्पण' ही कल्पना धार्मिक अर्थाची आहे. ईश्वरास समर्पण करण्याचा विधि या शब्दानें आठवतो व पवित्र भावना उदित होते. पितृसमर्पणभावनेचा पहिला आदर्श दाशरथि रामचन्द्र होय. नेहरूंच्या मनांतील पिता व दशरथ हे एकच होत. पुत्रशोकानें दशरथ दग्ध होऊन नष्ट झाला. अथांग पुत्रप्रेम तेथें होतें. त्याचेंच प्रत्यन्तर रामचन्द्राच्या असीम पितृभक्तींत मिळतें. रामचन्द्र हा पितृप्रधान कुटुंबसंस्थेंतील आदर्श पुत्र होय. पितृप्रधान समाज-

# पं. जवाहरलाल नेहरू यांचें थोर व्यक्तित्व

संस्थेतील ऐहिक भावनेचें उन्नयन ईश्वरभक्तींत होत असतें. उन्नयन पावलेल्या पितृनिष्ठेचें उत्कृष्ट निदर्शन खिस्तांत झालेलें दिसतें. रामचन्द्र पितृ- प्रधान समाजसंस्थेकरितां अत्यंत नाजूक अशा पत्नी- प्रेमाची आहुति देतो. रामचन्द्राच्या पत्नीप्रेमाची नेहरूंच्या क्रांतिप्रेमाशीं तुलना चांगली होऊं शकते. खिस्ताशीं तुलना करण्यासारखे अंश थोडे आहेत; परंतु मूळ भावनेचें साम्य आहे. मानवी इतिहासांत समर्पणभावना येशू खिस्तांत संपूर्णपणें परिणत झालेली दिसते. तो आकाशांतील पित्यास आपलें संपूर्ण जीवित वाहतो. तो अत्यंत ईश्वरशरण आहे. खिस्त हा ईश्वरनिष्ठेचा कळस बनला आहे.

या भावनेशीं प्रतियोगी असलेली भावना 'आत्मनिष्ठा' या शब्दानें व्यक्त होते. या भावनेचा धार्मिक इतिहासांतील उत्कृष्ट नमुना म्हणजे भगवान् बुद्ध होय. तो 'अनन्यशरण' आहे. तो ईश्वरास मानीत नाहीं. तो जगाला पिता आहे असें समजत नाहीं. पित्याची मुख्य इच्छा असते कीं, पुत्रानें लग्न करून नीट संसार करावा. बुद्ध ऐन उमेदींत सुंदर सापत्य पत्नीचा त्याग करून, पेटलेल्या घरांतून बाहेर पडावें, त्याप्रमाणें घरांतून बाहेर पडतो, ईश्वर न मानणाऱ्या धर्माची स्थापना करतो. हें पितृत्वाच्या व पितृप्रधान समाजसंस्थेच्या विरुद्ध असलेलें एक मोठें बंडच उद्भवलेलें असतें. त्यानंतर शतकानुशतकें सहस्रावधि तरुणांच्या अनेक पिढ्या तारुण्यांतच श्रमण बनत असतात; असा इतिहास आहे.

## पितृभक्तीचें आलंबन

आत्मसमर्पण व आत्मनिष्ठा या अत्यंत प्रति- योगी कल्पना आहेत. जवाहरलाल हें आत्मसमर्पणाचें उदाहरण आहे; अनन्यशरण आत्मनिष्ठेचें नव्हे. या आत्मसमर्पणवृत्तीची तयारी त्यांच्या बाल्यावस्थेंत झाली. बाळपणांत तिचें बीजारोपण झालें. ते सार्व- जनिक चळवळींत पडल्यापासून त्या बीजाच्या अंकुराला फूट येऊन बहर आला. आतां स्वराज्या- नंतर फल येऊं पहात आहे. लहानपणचा जीवनक्रम मानसशास्त्रदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा असतो. भावी आयुष्याची ढोबळ जन्मपत्रिका बालपणचें मानस- शास्त्रच लिहून ठेवीत असतें.

कै. पं. मोतीलाल नेहरूंवर लक्ष्मीचा वरदहस्त सतत होता; पाश्चात्य विद्येची सरस्वतीही कृपा- कटाक्ष फेंकीत होती. मनमोकळा व उदार पिता जवाहरलालांना लाभला. श्रीमंतीच्या सौख्याला उदार, मनमोकळ्या पित्याच्या खेळकर वृत्तीनें मिसळ- लेल्या वात्सल्याची जोड मिळाली होती. खान- दान घराण्यांतील बापाचा दरारा फार असतो. बाहेर गांभीर्य व हृदयांत वात्सल्य दडलेलें, असाच प्रकार बहुशः असतो. नेहरूकुटुंबांत याच्या उलट परिस्थिति होती. पाश्चात्य वळणही या कुटुंबाला खूप आलेलें होतें. काश्मीरी खानदानींत मुसलमानी राहणीची छाप खूपच असते तसेंच या कुटुंबाचें होतें. मुसलमानी उर्दू भाषा ह्या कुटुंबाची मातृभाषा होय. नागरी आतां मागाहून शिकूं लागले. हिंदु, मुसलमान व इंग्रज या तिन्ही संस्कृतींचें हें संगमस्थान बनलें. पाश्चात्य संस्कृतीच्या सर्व छटा ह्या कुटुंबाच्या राहणींत उमट- ल्या. व्यक्तिस्वातंत्र्य वैवाहिक जीवनांत सुद्धां मधून मधून मान वर काढीत असे. या वातावरणावर पित्याचें उदार साम्राज्य होतें. साधारणपणें ज्या कुटुंबांत पितृभक्तीचा प्रभाव असतो, तेथें ती पितृ- भक्ति बहुशः आदर व भीति या भावनांनीं मिश्रित असते. नेहरू-कुटुंबातील पितृभक्तींत हें मिश्रण नव्हतें. त्यामुळें त्यांतील मुलें लाडांत वाढलीं. लाडानें मुलें स्तुतिप्रिय व आत्मनिरीक्षणशून्यहि बनण्याचें भय असतें. गोडव्यानें व लाडानें भरलेल्या पितृवात्सल्याच्या वातावरणांतील मनामध्यें जे आदर्श निर्माण होतात त्यांत पित्याचीं चित्रें नकळतच चिरस्थायी होतात.

जवाहरलालांच्या सार्वजनिक जीवनाचा प्रारंभ मोठ्या कल्पनारम्य परंतु धामधुमीच्या परिस्थितींत झाला. पहिल्या देशव्यापी राजकीय चळवळींत ते जनतेपुढें आले. ती म्हणजे असहकारितेची चळ- वळ होय. या चळवळींत पं. मोतीलाल महात्माजींचे सहकारी व अनुयायी बनले. आपल्या शेंकडों सह- काऱ्यांना कौटुंबिक गोड बंधनांनीं सर्व बाजूंनीं बांधून टाकण्याची हातोटी महात्माजींच्या ठिकाणीं अप्रतिम होती. म. गांधी जवाहरलालांना पितृवत् भेटले. गांधींच्या रूपानें त्यांना पुनः मोतीलालच दिसले. पं. मोतीलालांच्या मृत्यूनें मोतीलालांची जागा म.

गांधींनीं साहजिकपणें भरून काढली. जवाहरलालांचें पितृभक्तीचें आलंबन स्मृतिशेष कधींच झालें नाहीं.

लावण्यशाली, अपत्यवती व आरोग्यामुळें यौवन मुसमुसत असलेली पत्नी पितृमातृभक्तीला फिकी पाडते. सुसंस्कृत निरोगी पत्नी जीवनाच्या वैभवाला प्रसवते. कारण मग मातृपितृभक्ति आपलें सामर्थ्य पत्नीच्या आकर्षणांत विलीन करते. पत्नी भविष्य-कालाकडे ओढणारी शक्तिदेवता होय. मानवी सृजनशक्ति भविष्यकालाला आकार देत असते; नवे आदर्श व क्रांतीचीं ध्येयें हीं सृजनशीलता अप्रातिहत व अनिरुद्ध असल्याचीं निदर्शनें होत. भूतकालाच्या बंधनांना छेदून नव्या नव्या आविष्काराला कारणी-भूत होणारी शक्ति पत्नीच्या प्रभावानें जागृत होते. नल व दमयंती यांचें आख्यान हेंच सूचित करीत असतें. पतीवांचून पत्नी व पत्नीवांचून पति, हें रेताड मैदानासारखें निरर्थक जीवन होय. नल हा कलाकारांचा मुकुटमणि होता. दमयंतीच्या अभावीं त्याचें सर्व जीवनरस सुकत चालले होते. तिच्या प्राप्तीनें पुनः त्याचें जीवन भरभराटीस आलें. अशा तऱ्हेचें वैवाहिक जीवन लाभलें म्हणजे शेवटीं पितृभक्ति मनाच्या अज्ञात दालनांत विश्रांति घेत कायम पहुडते. ती आदराच्या सदरांत केव्हां केव्हां प्रकट होते. आत्मप्रशंसेची आवड माणसांत अगाध आहे; त्यामुळें आपल्या मोठेपणाचा अलंकार म्हणून पितृभक्ति वा मातृभक्ति आपण दाखवीत असतों. परंतु ती भक्ति तिच्या विषयाप्रमाणेंच वयस्कर होऊन दुर्बल बनलेली असते.

सौ. कमलाबाई नेहरूंची प्रकृति नाजूक फार; नव्हे, दुखणाइताची. आजारी पत्नीचे पति एवढ्याच शब्दानें जवाहरलालांचा उल्लेख एका सुप्रसिद्ध गृहस्थांनीं आपल्या पत्र व्यवहारांत केलेला मला आठवतो.

भारतवर्ष हा देश म्हणजे अत्यंत प्राचीन असा जणूं काय वृद्ध पुरुषच होय. हा देश अमेरिके-सारखा नवा देश नव्हे; किंवा अतिप्राचीन थोर इतिहासपरंपरा नसलेला रशियासारखा देशही नव्हे. भारतवर्षाला प्राचीनतम भव्य इतिहास आहे. या देशाच्या पारतंत्र्यमुक्तीच्या चळवळीचे थोर अग्रणी जवाहरलाल बनले. या देशभक्तींत पितृभक्तीनें प्रवेश केला. भारतवर्षासारखा वृद्ध पुरुष आपल्या पुत्राच्या ठिकाणीं, 'आपण याचे पुत्र असल्यामुळें धन्य आहोंत' अशी भावना निर्माण केल्याशिवाय कसा राहील? अशी ही जवाहरलालांच्या समर्पणपरवृत्तीची पार्श्व-भूमि आहे. व्यक्तिस्वातंत्र्यप्रधान इंग्लिश संस्कृतीचा संस्कार झालेला असल्यामुळें समर्पणवृत्तीचा आवि-र्भाव शालीनता वा शरणागति या स्वरूपांत होत नाहीं. उलट आपण मोठ्या पित्याचे वारस, औरस पुत्र आहोंत, याच भावनेच्या डौलांत ती प्रकट होते. परंपरेची पूजा करण्यास लावणारा हा मोठे-पणा असतो. तो जवाहरलालांच्या आधुनिकतेच्या आवरणाखालीं सुंदरपणें झांकलेला आहे.

## नवीन युगांतील प्रेरणांचें आशास्थान

जवाहरलाल ही नवपाश्चात्य संस्कृतीचे उच्च संस्कार मिळालेली व्यक्ति असल्यामुळें, त्यांच्यांत वर्तमानयुगांतील अभिनव वैचारिक चळवळीचे पडसाद अप्रतिहतपणें उमटत असतात. त्यांच्या मनानें आधुनिक क्रांतिकारक विचारांचें मोकळे-पणानें स्वागत केलें आहे. लखनौ येथें भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदीय भाषणांत याचें उत्तम प्रत्यंतर मिळतें. भारतीय समाजरचनेंत आमूलाग्र फरक व्हावा, अशी त्यांची उत्कट मनीषा आहे. विज्ञाननिष्ठ दृष्टिकोणानेंच भारतीय जीवनाची बांधणी योग्य रीतीनें करतां येईल, असा आदेश ते वारंवार देत असतात. लोकसत्ता, व्यक्तिस्वातंत्र्य, दलितजनतेची बंधमुक्तता इत्यादि वर्तमानयुगाच्या आदेशांचें त्यांना चांगलें भान आहे. गेलीं अनेक वर्षें आंतरराष्ट्रीयतेस वरिष्ठ-स्थान देणाऱ्या जागतिक कल्पनांचा ते घोषही करीत असतात. सुधारलेल्या जगांतील समता-वादास व व्यक्तिस्वातंत्र्यवादास जवाहरलाल हें एक आशास्थान आतांपर्यंत वाटत आहे. गेलीं ३० वर्षें या देशांतील राजकीय युद्धांतले आघाडीचे समरधीर वीर म्हणून जगांतील लोकांना ते दिसत आहेत.

स्वराज्यप्राप्तीनंतर जवाहरलालांचें कार्यक्षेत्र बद-ललें आहे. ते आतां समरधीर वीर या नात्याच्या ऐवजीं भारतवर्षाचे आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय राजकार-

# पं. जवाहरलाल नेहरू यांचें थोर व्यक्तित्व

णाचे मुख्य मुत्सद्दी या नात्यानें पुढें येत आहेत. या वेळीं त्यांच्या अंतरंगाच्या गाभ्यांत वाढलेलें व्यक्तित्व प्रकट होऊं लागलें आहे. आतां त्यांचीं पावलें क्रांतीच्या दिशेनें पडत आहेत असें निश्चित म्हणवत नाहीं. दूरच्या काळांत अमलांत आणा-वयाची गोष्ट म्हणून त्यांनीं समाजवादास बर्फाच्या पेटींत थंडगार करून ठेविलें आहे कीं काय असेंही वाटूं लागतें.

काश्मीरच्या लढाईचा राजकीय भावार्थ कांहींही असो; काश्मीर भूलोकांतील नंदनवन व जवाहर-लालांच्या वाडवडिलांची परंपरागत जन्मभूमि होय. तेथें मुसलमानांची वस्ती बहुसंख्य आहे. स्वयं-निर्णयाच्या तत्त्वाप्रमाणें लोकमत घेतल्यास तें हिंदच्या बाजूनें पडेलच याबद्दल खात्री देणें कठीण आहे. परंतु तें कांहींही असलें तरी काश्मीरच्या प्रश्नांत जवाहरलालांची पितृभक्तिप्रधान भावना अनुस्यूत असणें अस्वाभाविक नाहीं. त्यामुळें या प्रश्नावर जवाहरलाल यांना नमतें घेणें कदाचित् जडही जाईल. काश्मीरची किंमत कदाचित् जागतिक महायुद्ध हीही ठरेल. तसें न झालें, व पाक-हिंद-युद्धानेंच निकाल लागावयाचा ठरला, तर हिंदमध्यें आर्थिक अनवस्था ओढवून बेबंद-शाहीही माजेल.

## हें व्यक्तित्व परंपरेविरुद्ध बंड करील का ?

पितृप्रधान भावनेच्या पोटींच परंपरेचा गाढ अभिमान भरलेला असतो. त्यामुळें पितृपूजा हा धर्म बनतो. परंपरेची पूजा हें पितृपूजेचें उत्कर्षाप्रत गेलेलें रूप होय. अशोकचक्रांकित ध्वज स्वराज्य-प्राप्तीच्या क्षणीं जवाहरलालांनीं उभारला. वृद्ध भारताच्या प्राचीन साम्राज्याचें तें स्मारक होय. अद्ययावत् ध्येयवादानें या प्रवृत्तीचा अर्थ उलगडतां येणें अशक्य आहे. तो ध्येयवाद पाठीमागें पहात नाहीं, पुढें पाहतो.

सारीपुत्त मोग्गलान या बुद्धशिष्यांचे अवशेष हिंदुस्थानांत सिलोनहून आणविले त्यांचें स्वागत करतांना जवाहरलाल त्यास वंदन करीत आहेत, अशा प्रकारचें प्रकाशचित्र ( फोटो ) प्रसिद्ध झालें आहे, तेंच पहाना ! त्यांत प्रतिबिंबित झालेली जवाहरलालांची नितान्त नम्रता त्यांच्या समर्पित व्यक्तित्वाचें हृदयंगम प्रमाण नव्हे, असें कोण म्हणूं शकेल ? आतां जवाहरलालांच्या मनावर अहंभावपूर्ण अशा राष्ट्रवादानें पूर्ण मात केली आहे, असें कित्येक टीकाकारांचें विधान केवळ खोडसाळ-पणाचें आहे, असें म्हणतांना विचारच करावा लागेल. समाजवादी क्रांतीच्या अद्भुतरम्य कल्पनांशीं क्रीडा व प्रेमालाप करतांना ते अजूनही दिसतात: नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ, त्यांनीं वर्गहीन समाजरचनेचें मार्क्सवादी ध्येय नुकतेंच कॉंग्रेसतर्फे पुकारलें आहे. परंतु त्या कल्पनांना प्रत्यक्ष सृष्टींत आणून त्यांच्याशीं संसार करण्यास ते तयार आहेत, असें म्हणणें मोठेंच धाष्टर्य ठरेल. कारण त्यांचें व्यक्तित्व सनातनी राष्ट्रीय परंपरेला न कळत समर्पित झालें आहे, अशी शंका येते.

हें अशा प्रकारचें व्यक्तित्व परंपरेविरुद्ध बंड करण्यास सिद्ध होईल का ? समाजवाद हें परंपरे-विरुद्ध असलेलें एक प्रचंड बंड आहे. हल्लीं समाज-वादाचे व मार्क्सवादाचे प्रयोग इंग्लंड, रशिया इत्यादि देशांत चालू आहेत. त्यांत समाजवादाचीं वैगुण्येंही उघडकीस येऊं लागलीं आहेत. म्हणून जवाहर-लालांनीं त्या ध्येयांना न तपासतां बिलगावें, असें कोणताच स्वतंत्रप्रज्ञ म्हणणार नाहीं. परंतु जवाहर-लालांची राजकीय कार्यप्रणाली लोकशाही स्वातंत्र्या-च्या संपूर्ण विकासार्थ आंखली जात आहे, असें निश्चितपणें म्हणवत नाहीं. कारण त्याकरितां त्यांनीं कोणताच मूलगामी कार्यक्रम आंखलेला दिसत नाहीं. त्यांचे अनेक सहकारी ठराविक प्रकारच्या नेहमींच्या राजकारणाचे उपासक आहेत. त्यांत जवाहरलाल फरक घडवीत आहेत, याला प्रत्यक्ष प्रमाण सांपडत नाहीं. कारण सर्वांचीच मनोभूमिका मूलतः पितृ-पूजक संस्कृतीची आहे.

जवाहरलालांच्या अत्यंत कठीण परीक्षेचा हा समय आहे. नवा इतिहास घडविण्याची संधि भाग्यानें व पराक्रमानें त्यांना लाभली आहे. हिंदु-स्थान भगवद्गीतेच्या पहिल्या अध्यायांत वर्णिलेलें कुरु-क्षेत्र बनविणें न बनविणें त्यांच्या हातांत सर्वस्वीं आहे. हें कुरुक्षेत्र बनलें तर पुढील पिढ्या—जर त्या थोड्याशा

शाबूत राहिल्या तर—काय म्हणतील हें सांगण्याची गरज नाहीं. नजीकच्या १०–२० वर्षांच्या भावी काळांत युद्ध व अंतर्गत यादवी टाळण्यांत जर जवाहरलाल यशस्वी ठरले, तर पुढील कितीतरी पिढ्या त्यांना धन्यवाद देतील; नव्हें, हा देश धन्य होईल !

समर्पणपर व्यक्तित्वांत एक प्रकारची संकुचित राष्ट्रभक्ति असते. ती असीम उत्कटत्वानें भरलेली असूं शकते. तिनेंच पहिल्या महायुद्धानंतरच्या काळांत युरोपातील फॅसिझमूला जन्म दिला. स्वराष्ट्रविघातक राष्ट्रीय अहंभावानें बेहोष होऊन हातावर शिरकमलें घेतलेल्या तरुण पिढीनें शास्त्र व शस्त्रें यांच्या साहाय्यानें माणुसकीला धोक्यांत आणिलें. हिंदुस्थानच्या शांततेचा प्रश्न सोडविण्यास पितृदेशाची अशी वेडी भक्ति असमर्थ आहे. अशा वेड्या भक्तींचें पीक या ठिकाणीं आतां भरभराटीस येऊं लागलें आहे. ‘ उच्च गुण व पवित्र सेवा म्हणजेच भारतीयता होय. अभारतीय विचारांनीं हे गुण दूषित होतात’ अशा प्रकारच्या विचारांच्या लोकांचें स्वागत काँग्रेसमध्यें होऊं लागलें आहे. म्हणून अशी भीति साधारपणें वाटते कीं, एक दिवशीं काँग्रेस पितृदेशाच्या भक्तीला चेतवून अशान्ततेच्या कृतान्ताला आवाहन तर देणार नाहीं ना ? या कृतान्ताला जवाहरलालच अडवूं शकतील ! पण तसें होईल काय ? महात्माजींचा आत्मा या देशांत जागृत असेल तर तसें होणारही नाहीं कदाचित् ! पण भरंवसा वाटेनासा झाला आहे.

जवाहरलाल बुद्धाचे भक्त आहेत, हें खरें आहे. परंतु त्यामुळें दोघांची मानसिक घटना सारखी आहे, असें म्हणतां येत नाहीं. सम्राट् संन्याशाचीही पूजा मनोभावानें करीत असतो.

### आत्मनिष्ठेचा ध्येयवाद प्रभावी होतो

समर्पणपर व्यक्तित्व थोर असूं शकतें. अलौकिक पराक्रमाचीं सामर्थ्यें त्यांत असूं शकतात. दाशरथि रामचन्द्र व ख्रिस्त हीं उदाहरणें समर्पणपर व्यक्तींचीं आहेत.

आत्मनिष्ठा ही बुद्धिवादी असते. बुद्धि जर निद्रित असेल, तर तिला ती जागृत करते. तिच्यांत अनंत अंतरें भेदून जाणारा प्रकाश उद्भवतो. अनासक्तीच्या योगानें ही बुद्धि अधिकाधिक विवेकक्षम होत जाते. समर्पणपर व्यक्ति असावधानपणें परिस्थितींचा अर्थ लक्षांत न घेतां काम करण्याचा फार संभव असतो. आत्मनिष्ठेचा ध्येयवाद देशविशेषाच्या मर्यादांना न जुमानतां दूरवरच्या गोष्टींचें याथातथ्यपूर्ण दर्शन घडवीत असतो. त्यासच परमार्थ म्हणतात.

भारतवर्ष पाप व पुण्य या दोघांचें क्षेत्र आहे. कोणताही देश तसा असतो. म्हणून देशास देव मानूं नये. देश दीर्घ काल जगतात, व मरतातही. ध्येयवाद अमर सिद्धान्तांच्या बैठकीवर उभारावा लागतो. मरणास न शिवणारीं ध्येयें मार्गदर्शक करावीं लागतात. जवाहरलालांना अशा ध्येयांचा प्रकाश नित्य लाभावा. उच्च ध्येयवादाच्या स्वप्नमय स्वर्गांतून उतरून या भूलोकच्या क्षणभंगुर राजकीय डावपेंचांत ते न सांपडोत. डोकें शाश्वत ध्येयवादाच्या स्वर्गांत, व पाय भूलोकावर टेकलेले, अशी त्यांची थोर मूर्ति ६१व्या वाढदिवसानंतर अधिकाधिक भव्य बनावी अशी आशा मी व्यक्त करतों.

---

## पूर्व आणि पश्चिम

पूर्व आणि पश्चिम, पौर्वात्य आणि पाश्चात्य असा आपण भेद करतों. परंतु वस्तुतः हा भेद निरर्थक आहे. वास्तविक पहातां ज्याला तुम्हीं पूर्व ( पूर्वेकडले देश ) म्हणून म्हणतां ती तुमच्या पश्चिमेला आहे.

—पं. जवाहरलाल नेहरू, कॅनडाच्या पार्लमेंटपुढें केलेल्या भाषणांतून, ( २५–१०–४९ ).





अनुक्रमणिका

# सारसंकलन

## सरदार वल्लभभाई पटेल

भारताचे एक श्रेष्ठ भाग्यविधाते सरदार पटेल यांच्या वयाला ३१ ऑक्टोबर १९४९ ला ७४ वर्षे पुरीं झालीं. त्या निमित्तानें त्यांच्या थोरवीचें स्मरण करणें व त्यांच्या ठिकाणींची आपली कृतज्ञता व्यक्त करणें उचित होईल. त्यांच्या कार्यांचें ' रसग्रहण ' करणारा एक लेख "मॉडर्न् रिव्ह्यू "च्या जानेवारी १९४९ च्या अंकांत ' बी. आर. के. ' या सहीनें प्रसिद्ध झाला आहे. तो महत्त्वाचा वाटल्यावरून त्यांतून पुढील भाग उद्धृत केला आहे :

" एका वर्षापूर्वी कोणालाहि कल्पना आली नसती कीं एका काळचे आग ओकणारे, चळवळ्ये सरदार वल्लभभाई एवढ्या लौकर पहिल्या प्रतीचे मुत्सद्दी ठरतील, हिंदुस्थानचे बिस्मार्क किंवा काव्हूर ठरतील. त्यांची विलीनीकरणाची योजना त्यांच्या मुत्सद्दीपणाची साक्ष आहे. पक्क्या मुत्सद्दीपणाचा तो श्रेष्ठ आविष्कार आहे. आणि पुष्कळांना आश्चर्य वाटतें तें याचें कीं त्यांच्या सर्वंकष बुद्धीला समृद्ध व्हायला इतका कमी वेळ पुरला. गांधीजींचें स्मरण 'भारताचे विधाते ' म्हणून चिरंजीव राहाणार असेल तर सरदार वल्लभभाईचें नांव ' आधुनिक भारताचे निर्माते' म्हणून इतिहासांत नमूद होईल. काठेवाडपासून आसामपर्यंत आणि काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत बलिष्ठ, संयुक्त आणि एकसंध असा भारत त्यांनीं निर्माण केला आहे.

" पूर्णपणें वास्तववादी असे आपले वल्लभभाई [illegible] भक्कम मनाचे आहेत उगाच बाह्य देखावा [illegible]. ते कमी बोलून कृति करणारे आहेत. त्यांच्या [illegible]बरोबरच त्यांच्या राजकारणांतील जिव्हाळ्या-[illegible] ते सर्वांत जास्त लोकांचे सर्वांत आदरणीय [illegible] बनले आहेत.

" सरदारांची स्वातंत्र्यप्राप्तीनंतरची सर्वांत मोठी कामगिरी म्हणजे ' विलीनीकरणाची योजना ' होय......हीं विलीनीकरणें आणि लोकसत्ताकरणें भविष्यकाळांत परिणाम घडविल्यावांचून राहणें शक्य नाहीं. त्यामुळें संस्थानी प्रजेला भारताच्या इतर भागांतील जनतेच्या सारखाच राजकीय, आर्थिक व सामाजिक दर्जा प्राप्त होणार आहे. त्यामुळें देशांत अधिक एकसूत्रीपणा आणि सलगपणा येईल; एवढेंच नव्हे पण, सरदारांच्या शब्दांत सांगावयाचें तर ' भारतीय संघांतील सर्व घटक खांद्याला खांदा लावून समान स्वातंत्र्यानें पुढें कूच करतील आणि त्यांत कोणी स्वतंत्र व कोणी गुलाम असा भेद राहणार नाहीं. '

" सरदारांच्या बोलण्यांतील स्पष्टवक्तेपणा हा त्यांचा खास गुण आहे, आणि त्यांना अमर्याद लोकप्रियता आणि आदर प्राप्त होण्यास हीच गोष्ट विशेष कारणीभूत झाली आहे. पश्चिम पंजाबांतील हिंदु-शीख जनतेला त्यामुळें दिलासा लाभला. त्यांच्या वारंवार होणाऱ्या ओजस्वी भाषणांनीं त्यांना आशेचा किरण पुन्हा दिसूं लागला आणि राष्ट्रीय सरकार चालवणाऱ्या पुढाऱ्यांतहि त्यामुळें विश्वास उत्पन्न झाला. एका प्रचंड अभूतपूर्व शोकान्त घटनेंत यातना आणि सर्वनाश, निराशा आणि हताशपणा यांचे काळेकभिन्न ढग निर्वासितांना वेढीत असतां त्यांना आशा व धैर्य द्यायला सरदार मधून-मधून भेटी देत असतात.

" चौऱ्याहत्तर वर्षांनंतरहि त्यांचा उत्साह आणि जोष पाहण्यासारखा आहे. त्यांना हा शक्तीचा अखंड झरा कोठून लाभत असेल कोण जाणे !... कांहीं काळापूर्वीं त्यांच्या राजकीय शत्रूंनीं, गांधीजींच्या अमानुष वधाचें निमित्त साधून, त्यांच्याविरूद्ध विषारी टीकेचा भडिमार केला होता.





अनुक्रमणिका

पण त्यांतून ते सुखरूप निभावले. एखाद्या पर्वतासारखे ते स्वस्थ आणि अचल राहिले. आणि हें एवढ्यामुळेंच घडूं शकलें कीं त्यांचें भारतीय राजकारणांतील स्थान अद्वितीय व अढळ आहे, त्यांची राजकीय महत्ता अत्युच्च आहे. सरदार पटेल म्हणजे जळती ज्योत आहेत; त्यांना कोणी कुत्सितपणें स्पर्श करावयास गेला कीं बोटें शेकलींच त्याचीं ! ''

## गुजरातचे पहिले वनस्पतिशास्त्रज्ञ : स्व. जयकृष्ण इंद्रजी

गुजरातचे पहिले मार्गदर्शी वनस्पतिशास्त्रज्ञ कै. जयकृष्ण इंद्रजी यांची १०० वी जन्मतिथि विजयादशमीच्या सुमारास गुजरातेंत व मुंबईस साजरी झाली. गुजरातचीं जंगलें आणि राया, पर्वत आणि टेकड्या यांवर उगवणाऱ्या वनस्पतींची त्यांनीं अर्वाचीन शास्त्रीय दृष्टीनें माहिती गोळा करून दोन महत्त्वाचे ग्रंथ लिहिले : 'बरडा पर्वतावरील वनस्पती' आणि "कच्छमधील औषधी वनस्पती ". पोरबंदरच्या जवळ हा बरडाचा डोंगर आहे व त्यावर नवनवीन वनस्पती लावण्याचा उपक्रम त्यांनीं सुरू केला. याविषयीं गांधींनीं आपल्या १९२६ च्या कच्छच्या प्रवासाच्या " स्मरणां "त असें लिहिलें आहे :

" श्री. जयकृष्ण इंद्रजी हे गुजरातचें भूषण आहेत. गुजरातेंत आपल्या विषयांत तन्मय झालेल्या थोड्याच व्यक्ती आहेत व अशा मुख्य व्यक्तींत श्री. जयकृष्ण इंद्रजी शोभतात. बरडा पर्वतावरलि झाडन् झाड व पानन् पान त्यांना माहीत आहे. वृक्षारोपणावर त्यांचा इतका विश्वास आहे कीं ते या कार्याला प्रथमस्थान देतात आणि त्यामुळें अनेक परिणाम दिसतलि असें ते मानतात. या विषयाचा त्यांचा उत्साह व विश्वास सांसर्गिक आहे. मला त्यांचा संसर्ग केव्हांचाच लागलेला आहे. राजा,प्रजा दोघेहि मनांत आणतील तर जेथें वृक्षांचें ज्ञान धारण करणारी अशी व्यक्ति असेल तेथें तिचा संपूर्ण लाभ घेऊन सुंदर वाटिका उत्पन्न करूं शकतील. ''

' युगदर्शन ' या नवीन गुजराती मासिकाच्या सप्टेंबरच्या अंकांत श्री. पोपटलाल गोविंदलाल शाह यांचा कै. जयकृष्णजींविषयीं परिचयात्मक लेख आला आहे. त्यांत ते म्हणतात :

"श्री. जयकृष्ण इंद्रजींचा जन्म इ.स.१८४९ मध्यें व अंत ८१ व्या वर्षी झाला. १८८६ ते १९०४ पर्यंत ते पोरबंदर संस्थानाचे 'क्यूरेटर ऑफ फॉरेस्ट्स ॲन्ड गार्डन्स ' होते व मग इ. स. १९२१ ते १९२७ पर्यंत त्यांनीं कच्छच्या 'स्टेट बॉटनिस्ट आणि राजमहाल सुपरिंटेन्डन्ट 'च्या हुद्द्यावर काम केलें. त्यांच्या विद्वत्तेचें व स्वतःचें मुख्य स्मारक 'बरडा पर्वतावरील वनस्पती' (१९१०) हें अनेक वर्षांच्या निरीक्षणाचें, अभ्यासाचें व संशोधनाचें फळ आहे. 'कच्छमधील औषधी वनस्पती ' हें त्यांचे दुसरें प्रसिद्ध पुस्तक.

" या (वनस्पतिशास्त्राच्या) दिशेनें प्रयत्न करण्याची संधि प्रख्यात पुराणवस्तुशास्त्रज्ञ श्री. भगवानलाल इंद्रजी यांच्या संबंधामुळें त्यांना मिळाली. १८७७ ते १८८८ हीं अकरा वर्षे जयकृष्णभाईंनीं भगवानलालजींच्या गुरुत्वाखालीं वनस्पतिशास्त्राचा अभ्यास केला. पंचावन्न वर्षे पुरीं झाल्यावर ते पोरबंदरहून इ. स. १९०४ मध्यें निवृत्त झाले व त्यानंतरच त्यांना आपल्या अनुभवांना पुस्तकाचें रूप द्यायला रिकामपण मिळालें.

" शास्त्रीय दृष्टीनें त्यांचें वरील पुस्तक उत्तम प्रकारचें आहे. पुस्तकाचा मुख्य भाग ६११ जातींच्या वनस्पतींचें वर्णन करण्यांतच खर्ची पडला आहे. असें असून वनस्पतींचें वैज्ञानिक वर्णन आणि शास्त्रीय परिभाषेचे विभाग उत्तम प्रकारें लिहिले गेले आहेत. वनस्पतींच्या वर्णनांत वापरलेले चुटके व दोहे यामुळें त्यांची शैली खूपच रसाळ आणि अर्थवाही झाली आहे. आणि त्यांनीं वापरलेली परिभाषा चालू काळांतहि वापरता येण्यासारखी आहे

" त्यांची तीव्र वैज्ञानिक बुद्धि आणि वृत्ति त्यांच्या पुस्तकांत चमकत आहे; त्यांची थोरवी अर्वाचीन विद्यार्थ्यांनीं खास समजून घेतली पाहिजे. अर्वाचीन विद्यार्थ्यांनी खास समजून घेतली पाहिजे. शिक्षणाच्या साधनांचा अभाव असतांहि दृढनिश्चय आणि मेहनत यांच्यायोगें अर्वाचीन वैज्ञानिक





अनुक्रमणिका

पद्धतीप्रमाणें आपला अभ्यास पुढें चालवून त्यांनीं गुजरातच्या शास्त्रज्ञांत आत्मश्रद्धा जागृत केली आहे. नवयुगाची नवी पद्धति आणि नव्या जनतेची नवशक्ति विकसविण्यासाठीं आवश्यक अशी परिस्थिति आपणाला अशा महापुरुषाच्या जीवनाचा अभ्यास केल्यानें लाभतें."

## आइन्स्टाइन व समाजवादी अर्थव्यवस्था

जगत्प्रसिद्ध भौतिकशास्त्रज्ञ आइन्स्टाइन हा एक मोठा तात्त्विक विचारवंतही आहे. "मन्थ्ली रिव्ह्यू"-मध्यें त्यानें एक लेख लिहून त्यांत आपले भांडवलशाही अर्थव्यवस्थेबद्दलचे विरोधी विचार मांडले आहेत. आइन्स्टाइन म्हणतो :

"आतांपर्यंत अशी अगणित कंठांतून घोषणा झाली आहे कीं मानवसमाज एका आणीबाणीच्या काळांतून जात आहे, त्याची स्थिरता बऱ्याच अंशानें डळमळीत झाली आहे. अशा परिस्थितींत स्वाभाविकपणें असेंच घडतें कीं व्यक्ती या लहान किंवा मोठ्या मानवसमूहाबद्दल उदासीन तरी होतात किंवा विरोधी बनतात. हें स्पष्ट करण्यासाठीं मी एक माझा अनुभवच सांगतों. मी एका बुद्धिमान् आणि विवेकी मित्राजवळ आणखी एका युद्धाच्या संभवाची चर्चा करीत होतों. त्याचें मत त्यामुळें मानवजातीचें अस्तित्वच जवळजवळ नष्ट होईल असें होतें. व मी म्हणालों कीं केवळ राष्ट्रीयतेच्याहून उच्च अशी एखादी संघटनाच तिला या संकटांतून वांचवूं शकेल. त्यावर तो शांतपणें व थंडपणें मला म्हणतो : 'मानवजातीचा नाश होण्याला तुमचा एवढा तीव्र विरोध कां असावा ?'.

"मला खात्री आहे कीं फार काळापूर्वी नव्हे, एका शतकापूर्वींच कोणींहि असें विधान इतक्या सहजपणें केलें नसतें ! ज्यानें समतोलपणा साधण्याचा प्रयत्न करूनहि तें जमणें ज्याला शक्य होत नाहीं अशा एका माणसाचे हे बोल आहेत.......... या आणीबाणीच्या बुडाशीं ही गोष्ट आहे कीं व्यक्तीला समाजावरील आपल्या परावलंबनाची फार जाणीव झालेली आहे, आणि तें परावलंबन संरक्षक बळ आहे असें न वाटतां आपल्या नैसर्गिक हक्कांवर गदा आहे किंवा आर्थिक अस्तित्वावर आक्रमण आहे असें त्यास वाटतें....... भांडवली अर्थव्यवस्थेनें जी आर्थिक अराजकता माजवली आहे त्यामुळेंच हें संकट उभें राहिलें आहे.

"या संकटापासून बचावण्याचा एकच उपाय आहे असें मला पटलें आहे व तो म्हणजे समाजवादी अर्थव्यवस्थेची स्थापना करणें. त्याबरोबरच सामाजिक ध्येयांच्या परिपूर्तीचें ज्ञान देणारी शैक्षणिक व्यवस्था निर्माण करणें हें होय."

मात्र व्यक्तीच्या नैसर्गिक हक्कांचें संरक्षण झालें पाहिजे याबद्दल आइन्स्टाइनचा आग्रह आहे.

## इंग्लंड-अमेरिकेचे पुढारी व शत्रुराष्ट्रांची "बिनशर्त शरणागति"

गेल्या दुसऱ्या महायुद्धांतील कांहीं महत्त्वाच्या गोष्टी आतां हळूहळू उजेडांत येऊं लागल्या आहेत. अमेरिकेचे अध्यक्ष रूझवेल्ट यांच्या जर्मनीजपानच्या "बिनशर्त शरणागती"बद्दलच्या आग्रहापुढें चर्चिलहि कसे नमले आणि परिणामीं लाखों शहरी आणि सैनिक प्रजेचा जीव कसा नाहक घेतला गेला याचें दिग्दर्शन "न्यू स्टेट्समन अॅण्ड नेशन"च्या ३० जुलैच्या अंकांत उत्तम प्रकारें केलें आहे. मि. किंग्स्ले मार्टिन यांनीं या विषयावर जो लेख लिहिला आहे त्यांतून पुढील उद्बोधक माहिती मिळते :

"गेल्या आठवड्यांत पार्लमेंटमध्यें जी 'बिनशर्त शरणागती'-विषयीं तिखट चर्चा झाली त्यांत बाहेर आलेली माहिती ऐतिहासिक महत्त्वाचीच आहे असें नाहीं. जर्मनींत अजून अराजक आहे व तो अजून सोव्हियतविरोधी पाश्चिमी संघाचा घटक बनलेला नाहीं, याविषयींच्या मि. मॅक्मिलनच्या तक्रारीमुळें चिडून मि. बेव्हिन यांनीं टोमणा मारला कीं 'बिनशर्त शरणागतीचा मूर्खपणा जर केला गेला नसता तर माझें काम सोपें झालें असतें! युद्धकालीन मंत्रिमंडळाचा विश्वासू सभासद म्हणून आपण चर्चिलनें कॅसाब्लान्काहून आणलेल्या या घोषवाक्याला विरोध केला नाहीं'... यावर चर्चिलनीं उत्तर दिलें कीं 'आपणाला स्वतःलाहि बिनशर्त शरणागतीची कल्पना आवडली नव्हती...रूझवेल्टनीं आपणाला न विचारतां काढलेल्या प्रसिद्धिपत्रकांत हे शब्द होते.' समुद्रापलीकडच्या एकनिष्ठ दोस्तांबरोबर काम करीत

असतां आपणाला निभावून नेणें भाग होतें, असें चर्चिल यांचें म्हणणें.

" मि. क्रॉसमननीं याचें एक उत्तम उदाहरण दिलें. जर्मन सेनापतींनीं बंड उभारल्याची बातमी २० जुलै १९४४ ला मध्यरात्रींच आली होती. परदेशमंत्री मि. ईडनशीं याबाबत त्यांच्या खात्यानें विचारविनिमय केला. पण परदेशमंत्र्यांच्या सूचना अशा आल्या कीं बिनशर्त शरणागतीच्या अटींप्रमाणें आपणाला ही बंडखोर मंडळी व नात्सी यांच्यांत भेदभाव करतां येणार नाहीं.

" आजला महत्वाचा मुद्दा हा आहे कीं जर्मनींशीं गोडगुलाबीनें घ्यायची इच्छा केवळ सोव्हियेत रशियाच्या भीतीमुळें उत्पन्न झाली आहे किंवा कसें व त्याला पुन्हां सशस्त्र करण्याची आवश्यकता भासूं लागली ती यामुळेंच कीं काय ? ...कम्यूनिझमचा प्रसार थांबविण्याचा विचार येथें असेल तर एक गोष्ट निश्चित कीं असंतुष्ट, बहुधा भुकेकंगाल आणि अधूनमधून काम मिळणाऱ्या मजूरांच्या पायावर पश्चिम युरोपांत दुबळें सैन्य निर्माण करण्यानें रशियाचा हेतु पराभूत होणार नाहींच, उलट तो वाढीस लागण्याचें भय आहे ! "

हें झालें जर्मन शरणागतीबद्दलचें. जपानी शरणागतीच्या बाबतींतहि असेंच घडलें असल्याचें त्याच अंकांत C. C. या पत्रलेखकानें दाखवून दिलें आहे. तो पत्रलेखक म्हणतो :

" या 'बिनशर्त शरणागती'नें केवळ जर्मनींतच आशा व धोरण यांचा नाश केला असें नव्हे. याच 'फॉर्म्यूल्या'मुळें हिरोशिमा व नागासाकी यांचा नाश झाला. १९४५ च्या मे-जूनमध्यें जपानी मंत्रिमंडळानें त्यावेळीं युद्धांत नसलेल्या मॉस्कोच्या मध्यस्थीनें, शरणागतीच्या अटी कळून घ्यायचा प्रयत्न केला. एकच सवलत मिळावी अशी त्यांची इच्छा होती कीं जपानचे सम्राट कायम राहावेत. आणि दोस्तांच्या योजनेंत कार्यसुलभतेसाठीं आधींच हें धोरण स्वीकारलेलें होतें. पण पॉट्सडॅम-परिषदेंतून उत्तर मिळालें तें बिनशर्त शरणागतीचें. अटींच्या ऐवजी अणुबॉंब दिला गेला आणि १,३०,००० नागरिक नाहक मारले गेल्यावर जपान्यांनीं तशी शरणागति स्वीकारल्यानें सहा महिन्यांपूर्वी मागितलेल्या सवलतींपेक्षांहि जास्त सवलती त्यांना मिळाल्या. तरीही चर्चिल म्हणतात कीं या शब्दांपासून कांहीं फार मोठी हानि झाली असें मला मुळींच वाटत नाहीं ! "

## वैयक्तिक स्वातंत्र्यावरील संकट

अमेरिकेचे जगद्विख्यात सरसेनापति जनरल आयझेनहॉवर यांनीं कोलंबिया युनिव्हर्सिटींत आपलें अध्यक्षीय भाषण करतांना कांहीं विचारणीय उद्गार काढले आहेत. सैनिक आणि राजकारण हा विषय वादग्रस्त तर खराच. प्रो. लास्की यांनीं इंग्लिश सरसेनापति मॉंटगोमरी यांनीं हॉलंडमध्यें केलेल्या कम्यूनिझमविरोधी ख्रिस्ती लोकशाही-बद्दलच्या भाषणावर टीका करतांना 'न्यू स्टेट्स्मन् अॅन्ड् नेशन'च्या जुलै २३ तारखेच्या अंकांत याविषयीं स्पष्ट मुद्दे मांडलें आहेत. उलट, जनरल आयझेनहॉवर यांचे विचार राजकीय असण्यापेक्षां तात्त्विक अधिक आहेत व म्हणूनच त्यांचें महत्त्व जास्त आहे. " मिरर " नांवाच्या प्रसिद्ध आंतरराष्ट्रीय मासिकानें आपल्या १५ व्या अंकांत या भाषणाचा वृत्तांत दिला आहे. सेनापति आयझेनहॉवर म्हणतात :

" सक्ती न करतां, वैयक्तिक कल्याण आणि सर्वसामान्य कल्याण यांचें समीकरण करणें यांतच स्वतंत्र देशांतील नागरिकत्वाचें खरें गमक सांपडतें... लोकशाही नागरिकत्वाचा संबंध मानवी संबंधाच्या एकूण बेरजेशीं असतो. अमेरिकेच्या बाबतींत बोलायचें तर चौदा कोटि मानवांचें स्वातंत्र्य, आजीविका आणि सर्वांगीण जीवन जगांतील परस्परसंबंधांवर अवलंबून आहेत. आपणांला जगापासून वेगळें राहतां येणार नसल्यांमुळें पृथ्वीवरील दोनशें कोटी मानवांचा एकमेकांशीं येणारा संबंध —कीं जो मानवजातीच्या अनेकविध क्रियांतून, आशांतून व भीतींतून व्यक्त होतो, तोसुद्धां या नागरित्व संबंधांत लक्षांत घ्यावा लागतो.

" गेल्या ७०० वर्षांच्या कालखंडांत हें वारंवार दिसून आलें आहे कीं, आमच्या जीवनवृत्तीची जाणीव असलेल्या सर्वांनीं इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां एका गोष्टीला विशेष किंमत दिली आहे : ती अमूल्य गोष्ट म्हणजे वैयक्तिक स्वातंत्र्य होय...








# सारसंकलन

"या स्वातंत्र्यास धोका उत्पन्न होणार नाहीं याबद्दल आपण सदैव जागरूक असलें पाहिजे...अशा दृष्टीनें पाहतां आढळतें कीं सत्तेचें एका व्यक्तीच्या हातांत किंवा समूहाच्या हातांत वाजवीपेक्षां फाजील केंद्रीकरण करण्यानें या स्वातंत्र्याला एक मोठें संकट उत्पन्न होतें. मग ती सत्ता केंद्रीकृत अर्थव्यवस्थेंत असो, स्वार्थी दडपण आणणाऱ्या समूहांत असो, कीं सबंध समाजाच्या विरुद्ध संघटित होणाऱ्या एखाद्या वर्गाच्या हातीं असो. यापैकीं कोणालाहि वरपगडा मिळवूं दिल्यास व्यक्तिस्वातंत्र्याचा संपूर्ण नायनाट करतां येणें शक्य आहे. राष्ट्राच्या प्रमुखाच्या हातीं केंद्रित झालेल्या सत्तेंतहि ही शक्यता आहे...

विद्यापीठांची, किंबहुना मानवानें निर्माण केलेल्या सर्व संस्थांची मुख्य जबाबदारी मानवी स्वातंत्र्य टिकविणें याबाबत आहे. मग त्याविरुद्ध कोणतेंहि तत्त्वज्ञान उभारलें जात असो किंवा कोणतेंहि बळ वापरलें जात असो !

"विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत स्थान मिळविण्यासारख्या कोणत्याहि विषयाला वरिष्ठांकडून मज्जाव होणार नाहीं. उदाहरणार्थ, कम्यूनिझम बद्दलच्या वास्तविक गोष्टी येथें शिकविल्या जातील; त्याची तात्त्विक वाढ, त्याचे राजकीय मार्ग, त्याचे आर्थिक परिणाम, त्याची भविष्यकालांतील संभाव्य दिशा यांचा येथें अभ्यास केला जाईल. आपल्या लोकशाही पद्धतीचीं मूल्यें खरोखरच पारखलीं जावयाचीं असतील तर आज कम्यूनिझमबद्दलच्या खऱ्या गोष्टी कळणें अनिवार्य होऊन बसलें आहे. कम्यूनिझम्, फॅसिझम् किंवा इतर कोणतेंहि पोलीसशाही राष्ट्राचें तत्त्वज्ञान यांच्याबद्दल अज्ञान असणें हें अत्यंत घातक रोगाचें अज्ञान असण्यापेक्षांही अधिक भयंकर आहे.

"आपणाला जें पाहिजे आहे तें सत्य होय—संपूर्ण सत्य होय. ही ज्ञानसाधना आपल्या संस्थांची रक्षक आहे एवढेंच नव्हे तर खोट्या तत्त्वप्रणालींचा पराभव करणारी पराक्रमी शक्तीहि तीच आहे."

## "विश्वराष्ट्रवाद (कॉस्मॉपॉलिटॅनिझम्) कीं श्रमिकप्रधान आंतरराष्ट्रवाद ?"

जनरल आयझेनहॉवरचे जे उद्बोधक विचार विशेषतः साम्यवादाच्या अभ्यासाबाबत वर दिले आहेत त्यांच्या अनुरोधानें पाहतां साम्यवादी नियतकालिकांत आलेले कांहीं विचारही मननीय वाटतात. "कम्यूनिस्ट रिव्ह्यू"च्या सप्टेंबरच्या अंकांत मि. जेम्स क्लग्मन् यांचा वरील मथळ्याचा एक स्पष्टोक्तिपूर्ण लेख आला आहे. त्यांत साम्यवादी राष्ट्रभक्तीची मीमांसा करण्याचा प्रयत्न असून भांडवलशाही आंतरराष्ट्रवादावर खरमरीत टीका आहे. साम्यवादी राष्ट्रांतील विचारप्रवाहांत हा राष्ट्रवादाचा प्रवाह मोठा विचारार्ह वाटत असल्यामुळें—विशेषतः गेल्या महायुद्धांतील रशियन् राष्ट्रवाद व टिटोचा राष्ट्रवाद पाहिल्यावर—या साम्यवादी छापाच्या राष्ट्रवादी निष्ठेशीं परिचय करून घेणें जरूरीचें वाटतें. मि. जेम्स् क्लग्मन् लिहितात :

"आजच्या विशिष्ट परिस्थितींत साम्यवादी हेच सुसंगत आणि खरेखुरे राष्ट्रप्रेमी ठरतात. सोव्हियेत जनतेची राष्ट्रनिष्ठा, त्या जनतेला आपल्या सांस्कृतिक परंपरेविषयींचा, समाजवादी वृत्तीनें निर्माण केलेल्या बहुविध प्रचंड कार्याविषयींचा, समाजवादी संस्कृति व समाजवादी विज्ञान यांविषयींचा वाटत असलेला अभिमान—यांची तुलना (जुन्या) राष्ट्रवादाशीं कोणत्याही बाबतींत होऊं शकत नाहीं....

"जनतेच्या लोकशाही (साम्यवादी) राष्ट्रांतहि श्रमिक जनतेंत अशी एक भावना जागृत होत आहे कीं आम्हींच आमच्या भूमीचे खरे जबाबदार मालक आहोंत; जुन्या राष्ट्रीय (Chauvinism) लष्करवादापेक्षां निराळाच असा एक राष्ट्रप्रेमी अभिमान त्यांच्यांत वाढीस लागला असून तो राष्ट्राला समाजवादाकडे जाण्यासाठीं अधिकाधिक प्रयत्न करावयास भाग पाडीत आहे.

"खऱ्याखुऱ्या समाजवादी राष्ट्रभक्तींत आणि श्रमिक जनतेच्या आंतरराष्ट्रीय एकजुटींत परस्परविरोध नाहीं. समाजवादी राष्ट्रभक्ति ही मजूरप्रधान आंतरराष्ट्रवादावरच उभारली पाहिजे; त्याचप्रमाणें श्रमिकप्रधान आंतरराष्ट्रवाद सुद्धां आपल्या पितृभूमी-

बद्दलच्या आदरावर व प्रेमावर उभारला गेला पाहिजे.

" श्रमिक आंतरराष्ट्रवाद हा ' बूर्झ्वा ' विश्वराष्ट्रवादाशीं संपूर्ण विरोधी आहे...आज श्रमिक आंतरराष्ट्रवादाचें कार्य मजुरांना सर्वोच्च महत्त्वाचें आहे.—त्यांच्या मंदीविरोधी झगड्यांत, शांततेसाठीं करावयाच्या झगड्यांत व त्यांच्या समाजवादाच्या स्थापनेच्या झगड्यांत तेंच अत्यंत महत्त्वाचें आहे.

" विश्वराष्ट्रवादाचा अर्थ असा आहे कीं, अमेरिकन साम्राज्यवादाच्या पुढारीपणाखालीं श्रमिक वर्गांच्या, श्रमिक जनतेच्या आणि श्रमिकसत्ताप्रधान देशांच्या विरुद्ध भांडवलदारीच्या बळांचें एकत्रीकरण करणें. श्रमिक आंतरराष्ट्रवादाचा अर्थ हा कीं, सोव्हिएत संयुक्तराष्ट्रांच्या झेंड्याखालीं श्रमिक वर्ग व श्रमिक जनता यांच्या बळांचें एकत्रीकरण करून शांततेसाठीं झगडणें, राष्ट्रीय स्वामित्वासाठीं झगडणें, 'बूर्झ्वा' सत्तेचा पाडाव व समाजवादस्थापना यांसाठीं झगडणें.

"दिमित्रोव (कॉपेकी) यानें साम्यवादी बाजू स्पष्ट केली आहे : ' आम्ही साम्यवादी लोक 'बूर्झ्वा' राष्ट्रवादी कट्टर विरोधी आहोंत. परंतु आम्ही राष्ट्रीय नकारवादाचे—'निहिलिझमूचे' पुरस्कर्ते नाहीं आणि आम्ही तसे वागणारहि नाहीं. श्रमिक आंतरराष्ट्रवादाबाबत मजूरवर्ग व मजूर—जनता यांना. शिक्षण देण्याचें काम करणें हे प्रत्येक साम्यवादी पक्षाचें मूलभूत कार्य आहे. परंतु जर कोणाला असें वाटत असेल कीं, यामुळें त्याला अमर्याद जनसमाजाच्या राष्ट्रीय भावनांची चेष्टा करायला परवानगी मिळते किंवा चेष्टा करणें अवश्य होतें तर तो माणूस अजून खराखुरा बोल्शेविक झालाच नाहीं आणि त्याला लेनिन व स्टॅलिनची राष्ट्रीय प्रश्नाबाबतची शिकवण समजलीच नाहीं असें समजावें. ' "

## बाल्टिमोरनें आपले गरीबखाने साफ केले.

बाल्टिमोर शहरांतील गलिच्छ वसतिस्थानें कशीं सुधारलीं याचें वर्णन कार्ल डेल्झर यानें 'सर्व्हे ग्राफिक' मध्यें केलें, तें ' रीडर्स डायजेस्ट'च्या ऑगस्टच्या अंकांत संक्षेपानें आलें आहे. बाल्टिमोरची व्यावहारिक दृष्ट्या सफल झालेली योजना कोणत्याहि शहराला अमलांत आणतां येण्यासारखी आहे असें त्याचें म्हणणें आहे :

" बाल्टिमोर, एम् डी, आपल्या गलिच्छ वसती नष्ट करीत आहे; त्यांना पाडून टाकीत नाहीं, तर त्या स्वच्छ करीत आहे. इतर कोणत्याहि मोठ्या शहरापेक्षां येथें अधिक गरीब लोकांना जास्त चांगल्या घरांत जास्त कमी किमतींत राहतां येऊं लागलें आहे. त्या शहराचा निवासगृहांचा प्रश्न सुटला आहे असें नव्हे; तर त्यानें आपलीं हजारों जुनीं घरेंच तात्पुरतीं तरी सुधारून टाकण्याचा त्वरित आणि कमी खर्चांचा मार्ग शोधून काढला आहे.

" या शहरानें आजूबाजूची सर्व जागा ' खडकाच्या पायाच्या गरीब—वसत्यां''मध्यें पालटवून टाकल्या. रंग, ओळंबा आणि चतुर चौकीदारी यांचा उपयोग करून त्यानें त्या वसतींत अभिमान जागृत केला आहे आणि जेथें खिडक्यांवर अनेक वर्षें खराब रद्दीचे तुकडे चिकटविलेले होते तेथें फितींचे पडदे लटकावले आहेत.

" जुनीं घरें पाडून नवीं घरें बांधायला मोकळी जागा न करतां बाल्टिमोरनें लोकांना आपल्या घरांत राहूं दिलें आणि त्यांचीं घरें सुरक्षित व आरोग्यशाली बनविलीं. शहराचे अधिकारी भिंती मजबूत करतात, छपरें दुरुस्त करतात, नवीन खिडक्या पाडतात, बाजूचीं पोटघरें ( out-houses ) पाडतात, न्हाणीघरें बांधतात, रंगाचा हात मारतात, मागील परसें साफ करतात, पायापुरणीं स्वच्छ करतात व तीं पाण्यापासून सुरक्षित ठेवतात, उंदरांचा नाश करतात. या सर्वांमुळें कमी प्रमाणांत खर्च होऊन मिळकतीची किंमत वाढते.

" म्युनिसिपालिटीचा हा ' झाडूचा ब्रश ' पुढील गोष्टींचा बनलेला आहे : आरोग्यविषयक त्वरितपरिणामी वटहुकूम आणि त्यांचा बिनचोक व निःपक्षपाती अंमल, उत्तम शिकून तयार झालेली पोलिसांची तुकडी, म्युनिसिपल हाउसिंग कोर्टांत असलेला निर्भय न्यायाधीश, आणि ज्यांना आपलीं घरें पाडलीं जाऊं नयेत असें वाटतें अशा घरमालकांत व ज्यांना जागा सोडून जावेसें वाटत नाहीं अशा भाडेकऱ्यांत सहकारी वृत्ति आणि या सर्वांना








जोडून असलेला बाल्टिमोरच्या नगराध्यक्षांचा—टॉमस द. लेसान्ड्रो यांचा—खराखुरा पाठिंबा.

"युद्धानंतरच्या पाहणींत असें आढळलें कीं शहराचा एक चतुर्थांश भाग अशा वसतींत आहे कीं जी आरोग्याच्या कसोटीला उतरूं शकत नाहीं!

"हे सुधारायला मदत दोन बाजूंनीं मिळाली. बाल्टिमोरच्या 'ईव्हनिंग सन' वृत्तपत्रानें एक लेखक व छायाचित्रकार नेमून गलिच्छ वसत्यांची कहाणी लोकांपुढें ठेवली. बाल्टिमोरच्या जनतेनें ती वाचली—आणि नाक उडवलें! त्याच वेळीं मिस् मॉर्टन् नांवाच्या एका उत्साही सामाजिक कार्यकर्त्रीनें ती गलिच्छ वसति पाहून एक समिति स्थापली. आता 'नागरिकांची प्लॅनिंग व हाउसिंग संघटना' या नांवानें प्रसिद्ध असलेल्या या समितींत सध्या हजारों विचारी नागरिक आहेत व शहराच्या सुधारलेल्या घरबांधणीच्या कामांतील उत्साहामागील खरी शक्ति हीच समिति आहे.

"घरबांधणीच्या या कायद्यांची अंमलबजावणी करण्यांत जेवढा खर्च हें शहर करतें त्यापेक्षां अधिक रक्कम कररूपानें वसूल करण्याची उमेद तें धरीत आहे. गतवर्षी म्युनिसिपल संस्थेला मिळालेल्या करापेक्षां १४ दशलक्ष डॉलर्स या वसत्या साफ करायला जास्त खर्च झाले. त्या खर्चाची ध्यानांत भरण्याजोगी तोंडमिळवणी करण्याची आशा या शहराला आहे.

"परंतु बाल्टिमोर कांहीं केवळ डॉलर–सेंटच्या धोरणानें विचार करीत नाहीं. त्याला जनतेच्या आरोग्याचा व मनोनिष्ठेचा विचार करावयाचा आहे."

## गुजरात व मध्यप्रांत-मेलघाट येथील आदिवासी

मागासलेल्या वर्गाच्या खात्यांतील एक अंमलदार डॉ. खानापूरकर यांनीं गुजरात विद्यापीठांत गुजराथेंतील आदिवासींविषयीं दिलेल्या भाषणावरून तयार केलेलें टिप्पण 'शिक्षण अने साहित्य' मासिकांत 'विद्यार्थी' देत असतात. त्याच्या सप्टेंबर-ऑक्टोबरच्या अंकांतून पुढील माहिती घेतली आहे. आहे:

"इ. स. १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें अखिल भारताच्या ३८९० लक्ष लोकसंख्येपैकीं २५४ लाख (म्हणजे ६·५३ टक्के) आदिवासी म्हणून नोंदले गेले. त्यांची वसती देशाच्या निरनिराळ्या भागांत कमीजास्त आहे. मुंबई इलाख्याच्या २०८ लाखांच्या वस्तींत १६·१४ लाखांची वस्ती (७·७५ टक्के) आदिवासींची होती. हरिजनांच्या तुलनेनें पाहतां यांत जवळजवळ २ लाखांचा फरक पडतो. म्हणजे एक टक्काच कमी आहे. हा प्रश्न वस्तीच्या दृष्टीनें हरिजनांच्या एवढाच आहे. आदिवासींची मागासलेली अवस्था जवळजवळ हरिजनासारखीच आहे. म्हणूनच गांधीजींनी त्यांच्या सेवेला रचनात्मक कार्यांत स्थान दिलें.

### प्रांतवार आदिवासी

| | आदिवासी (लक्ष) | एकंदर वस्तींत आदिवासींचें शेकडा प्रमाण |
|---|---|---|
| अखिल भारत (संस्थानांसह) | २५४ | ६·५३ |
| संस्थानें | ८७·२८ | ९·३६ |
| प्रांत | १६७ | ५·६४ |
| मुंबई | १६·१४ | ७·७५ |
| मद्रास | ५·६ | १·१३ |
| बंगाल | १८·८९ | ३·१ |
| सं. प्रांत | २·८९ | ०·५२ |
| पंजाब | — | — |
| बिहार | ५०·५ | १५·५६ |
| मध्यप्रांत | २९·३७ | १७·६ |
| आसाम | २४·८५ | २४·३ |
| सरहद्दप्रांत | — | — |
| ओरिसा | १७·२१ | १९·९९ |
| सिंध | ०·३७ | ०·८२ |
| बडोदें संस्थान | ३·७३ | १३·०९ |

"या आंकड्यांवरून दिसतें कीं मुंबई प्रांतापेक्षां बिहार, मध्यप्रांत, आसाम व ओरिसा येथें आदिवासींचें प्रमाण अधिक आहे. गुजरातेंत एकंदर आदिवासी ६,०३,०८३ असून त्यांचें एकंदर वस्तीशीं प्रमाण १४·७ आहे व जवळच्या बडोदा संस्थानांतहि ते बऱ्याच प्रमाणांत आहेत.

" या आदिवासींची एकच जात नाहीं. अनेक पोटजाती आहेत. मुख्य तीन विभाग : (१) भिल्ल; (२) कोळी, (३) मुंडा. २९ पोटजातींतील २३ गुजराथेंत आहेत.

" त्यांची आर्थिक स्थिति ( दक्षिण गुजराथच्या आदिवासींच्या पाहणीवरून ):

७५ टक्के जमीनीशिवायचे शेतमजूर
२० ,, जवळ थोडीफार जमीन असलेले
५० ,, ,, स्वतःची ढोरें ,,
८३ ,, कर्जांत बुडालेले; त्यातलि ५४टक्के देणें लग्नाप्रीत्यर्थ.

व्याजाचा दर शेंकडा २५ टक्के असतो. शेंकडा ६ जण सामान्यतः कुटुंबांत असतात. ५५ टक्के लोकांचें दरमाणशीं वार्षिक उत्पन्न रु. २५ पर्यंत असते व २० टक्के लोकांचें उत्पन्न २६ ते ५० पर्यंत असतें.

मुख्य धंदा मजुरी. कित्येक शेती करतात पण बहुधा मालकीहक्क नसलेल्या जमिनींत. शिक्षण १ टक्का. सही करणारे असतील नसतील. "

---

## चीनची नवी नेतृ–त्रयी

२ ऑक्टोबर १९४९ ला चीनमध्यें नवें 'लोकसत्ताक राज्य' रीतसर स्थापन झाल्याचें जाहीर झालें. त्याला सोव्हिएट रशियानें लगेच मान्यताही देऊन टाकली. चीनच्या या नव्या लोकसत्ताक राज्याचें नेतृत्व ज्या कम्युनिस्ट-त्रयीकडे आलें आहे ती म्हणजे : अध्यक्ष–माओ त्से तुंग; मुख्य प्रधान आणि परराष्ट्रमंत्री–चौ एन-लै; आणि कम्युनिस्ट सैन्याचा मुख्य आधिपति–जनरल चू तेह. हे तिघेही मूळचे दक्षिण चीनमधले असून, १९२१ पासून, अगदी कम्युनिस्ट पक्षाच्या संस्थापनेपासून ह्या पक्षाचे सभासद आहेत. माओचें वय ५५ वर्षांचें असून तो एक अत्यंत प्रतिभाशाली आणि बुद्धिमान् असा पंडित आहे. पक्षाच्या कामांत पडण्यापूर्वी तो पेकिंग विश्वविद्यालयामध्यें ग्रंथपालाचें काम करीत होता. चीनमधील कम्युनिस्टांचा तो "लेनिन" असून त्याचा 'New Democracy' हा ग्रंथ पक्षाचा प्रमाणग्रंथ मानला जातो—सेनापति चू तेह म्हणजे माओचा उजवा हात. तो ६६ वर्षांचा असून लष्करी व्यूहरचनेंत, विशेषतः गनिमी युद्धांत तज्ज्ञ आहे. त्याचें आरंभीचें लष्करी शिक्षण जर्मनीमध्यें झालें.–चौ एन-लै हा मोठा चतुर मुत्सद्दी असून तो बरींच वर्षे 'कॉमिंटर्न'च्या कार्यकारी मंडळावर होता. या बड्या त्रयींत मॉस्कोला जाऊन आलेला असा हा एकच आहे. सुप्रसिद्ध मादाम सन्–यत्–सेनबाईंचा या त्रयीला संपूर्ण पाठिंबा असून, त्या नवीन चिनी 'पालिट् ब्यूरो'च्या उपाध्यक्ष आहेत. सन्–यत्–सेनबाई ह्या मादाम चँग-कै-शेकच्या वडील भगिनी होत.

—'टाइम्स ऑफ इंडिआ', ४।१०।४९

---

## चुकीची दुरुस्ती—

'नवभारत'च्या ऑक्टोबरच्या अंकांत श्री. रा. ग कुंभोजकर यांच्या 'गांधीजींचे आवडते ग्रंथ' या लेखांतील शेवटच्या परिच्छेदांत 'स्वर्ग तुमच्या अंतर्यामीं आहे' हें पुस्तक रास्किनचें आहे, असें म्हटलें आहे तें चूक आहे. "The kingdom of God is within you" हें तें पुस्तक असून तें टॉल्स्टॉयचें आहे.

या नोव्हेंबर अंकांत :

पान १० वर, २ ऱ्या स्तंभांत, वरून १९ व्या ओळींत, 'वकाल'च्या ऐवजीं 'बकाल' वाचावें.
पान १२ वर, २ ऱ्या ,, , वरून ९ व्या ,, , 'काबू–' ,, ऐवजीं 'कानू–' वाचावें.